॥ श्रीः ॥

# सुलभ श्रीमद्भागवत

## अष्टम स्कन्ध

## अध्याय १ ला

परीक्षित्‌राजा म्हणाला,—हे गुरो, ज्यामध्यें मरीचि प्रभृति प्रजापतींची मनुकन्यांपासून पुत्रपौत्रादिक उत्पत्ति झाली, अशा या स्वायंभुवमनूच्या वंशाचा वृत्तांत तुझ्यापासून मी सविस्तर श्रवण केला. आतां दुसऱ्याहि मनूंचा वृत्तांत तूं आम्हांला सांग ॥ १ ॥ हे ब्रह्मनिष्ठा, ज्याच्या मन्वन्तरामधील परमपूज्य श्रीहरीचीं अवतारचरित्रें कवि वर्णन करितात, त्या त्या मन्वन्तरांचा वृत्तांत श्रवण करण्याची आम्हांला इच्छा आहे; तरी कृपा करून तो तूं आम्हांला कथन कर ॥ २ ॥ हे शुकाचार्या, मागें होऊन गेलेल्या, सध्यां चालू असलेल्या व पुढें येणाऱ्या मन्वन्तरांमध्यें विश्वपालक भगवंतानें जें चरित्र केलें व जें करील तें सर्व कथन करा ॥ ३ ॥

शुकाचार्य म्हणाले,——हे परीक्षित्‌राजा, ज्या कल्पामध्यें देवादिकांची उत्पत्ति झाली, त्या पहिल्या स्वायंभुवमन्वन्तराची कथा मी तुला पूर्वींच सांगितली ॥ ४ ॥ त्या स्वायंभुवमनूच्या आकूति व देवहूति ह्या कन्यांच्या पोटीं भगवान् श्रीहरीनें अनुक्रमानें धर्मोपदेश करण्याकरिता यज्ञरूपानें व ज्ञानोपदेश करण्याकरितां कपिलरूपानें पुत्राच्या नात्यानें अवतार धारण केले ॥ ५ ॥ हे कुरुश्रेष्ठा, त्यांपैकीं भगवान् कपिलानें काय केलें, तें मीं तुला पूर्वींच वर्णन केलें आहे. आतां भगवान् यज्ञरूप परमेश्वरानें जें केलें तें मी तुला कथन करितों ॥ ६ ॥ हे राजा, कामभोगाविषयीं विरक्त झालेला तो शतरूपेचा पति स्वायंभुवमनु राज्याचा त्याग करून तप करण्याकरितां भार्येसह वनामध्यें निघून गेला॥ ७ ॥ तेथें सुनंद नदीच्या तीरीं शंभर वर्षेंपर्यंत एका पायावर उभा राहून घोर तप करीत असतां, पुढील उद्गार त्याच्या तोंडांतून निघाले ॥ ८ ॥

मनु म्हणाला,——ज्याच्या योगानें हें विश्व सचेतन होतें; परंतु ज्याला हें विश्व सचेतन करीत नाहीं, व हें विश्व सुषुप्ति अवस्थेमध्यें निजलें असता जो साक्षिरूपानें जागृत असतो, त्याला हा लोक जाणत नाहीं परंतु तो मात्र ह्या लोकाला जाणतो ॥९॥ ब्रह्मांडा-

मध्यें म्हणून जें कांहीं सचेतन किंवा अचेतन असें आहे, तें सर्व ईश्वरानें व्यापिलें आहे; ह्याकरितां त्या ईश्वरानेंच जें कांहीं दिलें असेल त्याच्याच योगानें तूं भोगांचा उपभोग घे, दुसऱ्या कोणाच्याहि धनाची आकांक्षा धरूं नकोस ॥ १० ॥ लोक हो, जो स्वतः पाहात असून कोणाच्याहि डोळ्याला दिसत नाहीं; ज्याचें ज्ञान कधींहि नष्ट होत नाहीं; त्या सर्वांतर्यामी व निःसंग अशा परमेश्वराला तुम्ही भजा ॥ ११ ॥ उत्पत्ति, स्थिति, नाश, स्वकीय व परकीय हीं ज्याच्यापासून होतात व विश्व हें ज्याचें स्वरूप आहे तेंच सत्य-स्वरूप व परिपूर्ण असें ब्रह्म होय ॥१२॥ तो ईश्वर जन्मादिविकाररहित, कालत्रयाबाधित, स्वयंप्रकाश व अनादि असून हें विश्व त्याचें स्वरूप आहे आणि त्याला अनंत नांवें आहेत. तो ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति व संहार आपल्या मायेच्या योगानें करीत असतो आणि स्वतः निरिच्छ असल्यामुळें विद्येच्या योगानें मायेचा त्याग करून तो वस्तुतः कर्मरहितच असतो ॥ १३ ॥ म्हणून ऋषिसुद्धां प्रथमतः मोक्षाकरितां कर्म करितात. कारण निष्काम कर्म करणाराच पुरुष प्रायशः निरिच्छ होतो ॥ १४ ॥ आत्मलाभानेंच सर्व इच्छा पूर्ण झाल्या-मुळें भगवान् ईश्वर कर्म करीत असला तरी त्याच्या ठिकाणीं तो आसक्त होत नाहीं. ईश्वराला अनुसरून वागणारे लोकहि त्याच्याप्रमाणेंच कर्मांच्या ठिकाणीं आसक्त न झाल्या-मुळें त्यांना दुःख होत नाहीं ॥ १५ ॥ यास्तव जो सर्वधर्मप्रवर्तक असल्यामुळें स्वतःच्या आचरणानें मनुष्यांना शिक्षण देण्याकरितां मनुष्यावताररूप मार्गाचें योग्य प्रकारें अवलंबन करून कर्म करितो, जो ज्ञानी असल्यामुळें अहंकाररहित आणि जो परिपूर्ण असल्यामुळें निष्काम आणि स्वतंत्र आहे, त्या परमात्म्याला मी शरण जातों ॥ १६ ॥

शुकाचार्य म्हणाले, — हे परीक्षित्‌राजा, एकाग्र अंतःकरणानें युक्त असूनहि ह्याप्रमाणें मंत्ररूप उपनिषदाचा उच्चार करीत असलेल्या मनूला अवलोकन करून क्षुधेनें पीडित झालेले असुर व राक्षस त्याला भक्षण करण्याकरितां त्याच्या अंगावर धावून गेले ॥ १७ ॥ मनूला भक्षण करण्याचा निश्चय केलेल्या त्या असुरादिकांना पाहून सर्वसाक्षी यज्ञनामक श्रीहरी याम नांवाच्या देवांसह तेथें आला आणि त्या राक्षसांना मारून स्वर्गाचें पालन करूं लागला. हा यज्ञ स्वायंभुवमन्वन्तरांतील स्वर्गाधिकारी इंद्रच होय. त्याचे पुत्र याम हे त्या मन्वन्तरांतील इतर अधिकारी म्हणजे देव झाले ॥ १८ ॥ अग्नीचा स्वारोचिषनामक जो पुत्र तो दुसरा मनु असून द्युमान्, सुषेण व रोचिष्मान् इत्यादि त्याचे पुत्र होत ॥१९॥ त्या मन्वन्तरामध्यें यज्ञाचा पुत्र जो रोचन तो इंद्र होता. दुसरे यज्ञाचे पुत्र तोष, प्रतोष, संतोष, भद्र, शांति, इडस्पति व इध्म हे होत. ऊर्जस्तंभ, प्राण, बृहस्पति, दत्त, अत्रि आणि च्यवन हे ब्रह्मवेत्ते सप्तर्षि होत ॥ २० ॥ वेदशिरानामक ऋषीची तुषिता नांवाची पत्नी होती तिच्या ठिकाणीं विभु ह्या नांवानें प्रख्यात असा भगवंताचा अवतार झाला ॥ २१ ॥ यमनियमादि साधनसंपन्न अशा अठ्यांशीं हजार मुनींनीं कौमार अवस्थेपासूनच ब्रह्मचर्य स्वीकारलेल्या त्या विभूचें व्रत शिकून घेतलें, व त्याचें आचरण ते करूं लागले ॥ २२ ॥ हे राजा, प्रियव्रताचा उत्तमनामक पुत्र तिसरा मनु झाला. पवन, सृञ्जय आणि यज्ञहोत्र इत्यादि त्याचे पुत्र होते ॥ २३ ॥ वसिष्ठाचे पुत्र जे प्रमदादिक,

ते या मन्वन्तरांतील सप्तर्षि असून सत्य, वेदव्रत व भद्र हे देव होते आणि सत्यजित् नांवाचा इंद्र होता ॥ २४ ॥ धर्माच्या सनृतानामक भार्येच्या पोटीं भगवान् पुरुषोत्तम सत्यसेन नांवानें प्रसिद्ध होऊन सत्यव्रतासह अवतीर्ण झाला ॥ २५ ॥ इंद्राशीं सख्य करून त्यानें, खोटें भाषण हेंच ज्याचें व्रत आहे अशा दुष्ट स्वभावाच्या आणि प्राणिमात्राशीं द्रोह करणाऱ्या यक्षराक्षसादि भूतगणांचा वध केला ॥ २६ ॥ ह्या उत्तमनामक तिसऱ्या मनूचा जो तामसनामक भाऊ होता, तो चौथा मनु झाला. त्याचे पृथु, ख्याति, नर, केतु इत्यादि दहा पुत्र होते ॥ २७ ॥ या तामसमन्वंतरामध्यें सत्यक, हरि व वीर ह्या नांवाचे देव असून त्रिशिख या नांवाचा इंद्र होता आणि ज्योतिर्धामा, पृथु, काव्य, चैत्र, अग्नि, धनद व पीवर असे सप्तर्षि होते ॥ २८ ॥ हे राजा, विधृतिनामक देव त्या काळीं असून त्यांनीं कालेंकरून नष्ट झालेले वेद स्वसामर्थ्यानें धारण केले ॥ २९ ॥ त्या मन्वतरामध्येंहि हरिमेधाच्या हरिणी नामक स्त्रीच्या पोटीं भगवंतानें हरि ह्या नांवानें प्रसिद्ध असा अवतार धारण केला आणि मकरापासून गजेंद्राला मुक्त केलें ॥ ३० ॥

राजा म्हणाला,—हे शुकमुने, मकरानें ग्रासून टाकलेल्या गजेंद्राला श्रीहरीनें कसें सोडविलें हें श्रवण करण्याची आम्हांला इच्छा आहे ॥ ३१ ॥ कारण जीमध्यें श्रेष्ठकीर्ति भगवान् श्रीहरीचें गुणवर्णन असतें ती कथा धनाची प्राप्ति करून देणारी, अभीष्ट फळ देणारी, मोक्षकारक आणि फारच पुण्यकारक असते ॥ ३२ ॥

सूत म्हणाला,—हे शौनक हो, याप्रमाणें प्रायोपवेशन करून बसलेल्या परीक्षित् राजानें व्यासपुत्र शुकाचार्याला भगवत्कथा सांगण्यासाठीं विनंति केली असतां शुकाचार्यानें त्याच्या विनंतीला मान दिला आणि त्या सभेमध्यें सर्व ऋषि श्रवण करीत असतां, मोठ्या आनंदानें त्या कथा सांगण्यास त्यानें आरंभ केला ॥ ३३ ॥

**अध्याय पहिला समाप्त**

# अध्याय २ रा

शुकाचार्य म्हणाले– हे राजा, त्रिकूट ह्या नांवानें असलेला एक श्रेष्ठ पर्वत आहे. त्याच्या सभोंवतीं क्षीरसमुद्राचें वेष्टन असून तो अतिशय शोभिवंत आहे. त्याची उंची दहा हजार योजनें व परिघहि तितकाच असून त्याला रुप्याचें, लोखंडाचें व सुवर्णाचें अशीं तीन शिखरें आहेत व त्या शिखरांनीं तो क्षीरसागर, दशदिशा व आकाश यांना प्रकाशित करितो ॥ १ ॥ २ ॥ रत्नें व धातू ह्यांच्या योगानें तो चित्रविचित्र झालेला असून नाना प्रकारच्या लतावृक्षांच्या बेटांनीं युक्त अशीं इतर शिखरें आणि झऱ्यांच्या उदकांचे प्रवाह ह्यांच्या योगानें सर्व दिशांना शोभा आली आहे ॥ ३ ॥ त्याच्याभोंवतीं उत्पन्न होणाऱ्या क्षीरसागराच्या लाटांनीं त्याचा पायथा नित्य धुऊन निघत असतो आणि त्याच्यावरील पाचूच्या खड्यांमुळें तेथील भूमि श्यामवर्ण झालेली आहे ॥ ४ ॥ त्या पर्वतांच्या गुहांमध्यें सिद्ध, चारण, गंधर्व, विद्याधर, मोठे नाग, किन्नर आणि अप्सरांचे समुदाय हे नित्य क्रीडा करीत असतात ॥ ५ ॥ किन्नरादिकांच्या गायनांच्या मोठ्या ध्वनीमुळें त्याच्या गुहा नादयुक्त होत असतात, व उन्मत्त सिंह तो नाद सहन न झाल्यामुळें येथें कोणी तरी दुसरा सिंह आहे कीं काय अशा संशयानें त्यांच्याकडे पाहून गर्जना करीत असतात ॥ ६ ॥ हे राजा, तो पर्वत नाना प्रकारच्या वनपशूंच्या समूहांनीं व्यापिलेला व गुहांच्या योगानें सुशोभित झालेला असून चित्रविचित्र वृक्षांनीं युक्त आहे. त्या ठिकाणीं देव क्रीडा करतात व वनामध्यें मधुर शब्द करणारे पक्षी इतस्ततः हिंडत असतात ॥ ७ ॥ त्यावरून स्वच्छ उदकांच्या नद्या वाहात असून अनेक सरोवरेंहि त्यावर आहेत. त्यावरील वाळवंटाची वाळू रत्नांच्या कणांची असून त्यांच्या सरोवरांतील पाणी देवांगनांच्या स्नानामुळें उत्पन्न झालेल्या सुवासानें सुगंधित झालेलें असतें, व त्यांवरून वाहणारा वायुहि तसाच सुगंधित असतो ॥ ८ ॥ त्या पर्वताच्या प्रदेशांत भगवान् वरुणाचें ऋतुमत् नांवाचें एक उपवन आहे. त्यांतील दिव्य वृक्ष फुलांनीं व फळांनीं नित्य भरलेले असतात. तें उपवन सर्व बाजूंनीं सुशोभित असून देवांगनांचें क्रीडास्थानआहे. त्या पर्वतावर मंदार, पारिजात, गुलाब, अशोक, चंपकइत्यादि अनेक वृक्ष दृष्टीस पडतात ॥ ९ ॥ १० ॥ खिरणी, फणस आंबे, अंबाडे, पोफळी, नारळी, खजूर, महाळुंग, मोह, साग, ताड, तमाल, असाणा, अर्जुन रिठे, उंबर, पिंपरी, वट, पळस, चंदन, लिंब, कांचन, सुरू, देवदार, द्राक्ष, उस, केळी, जांभळी, बोरी, बेहडे, हिरडे, भुईआंवळी, बेल, कवठ, जंबीर व बिब्बा इत्यादि वृक्षांनीं तो भरलेला असून त्यावर एक अत्यंत विस्तीर्ण असे सरोवर आहे व त्यांत सुवर्णकमळें नित्य प्रफुल्लित झालेलीं असतात ॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥ १४ ॥ श्वेत कमळें, निळीं कमळें, संध्याविकासी श्वेत कमळें आणि साधारण कमळें ह्यांच्या योगानें तें फार शोभायमान दिसत असून भ्रमरांच्या गुंजारवानें व मधुर शब्द करणाऱ्या पक्ष्यांच्या गायनानें तें दुमदुमलेलें असतें ॥ १५ ॥ हंस,

कारंडव, चक्रवाक आणि सारस ह्या पक्ष्यांनीं अगदीं गजबजून गेलें असून पाणकोंबडे, टिटवे व पाणकावळे यांचे थवे त्यांत सारखे शब्द करीत असतात ॥ १६ ॥ त्यांतील मासे व कासव इकडेतिकडे फिरूं लागले म्हणजे त्यांतील कमळें हालतात व त्यामुळें त्यांच्या रजः- कणांनीं त्यांतील पाणी गढूळ होतें. त्याच्या भोंवतीं कदंब, वेत, देवनळ, नीलवर्ण, अशोक व तिवस ह्या वृक्षांच्या रांगा सारख्या लागून गेल्या आहेत॥१७॥ तसेंच,कुंद,तांबडी कोरांटी, अशोक, सिरस, कुडा, हिंगणबेट, कुब्जक, पिवळी जाई, नागचांफा, जाई, मोगरा, शतपत्र व बटमोगरा इत्यादि अनेक फुलझाडें व वेली त्यांत असून नित्य फलपुष्पांनीं भरलेले अनेक वृक्ष त्याच्या तीरावर असल्यामुळें त्याला फारच शोभा आलेली आहे ॥ १८ ॥ ॥१९॥ असो. अशा त्या चित्रकूट पर्वतावरील अरण्यांत हत्तींच्या कळपांचा अधिपति अस- लेला एक गजेंद्र एकदां त्या सरोवराजवळ आला. त्याच्या केवळ गंधामुळेंच सिंह, मोठमोठे हत्ती,व्याघ्रादिक श्वापदें,सर्प,हरण,गेंडे,मोठमोठे साप, पांढरे बगळे,शहामृग व बनगाई इत्यादि प्राणी भयभीत होऊन पळून जाऊं लागले; पण लांडगे, डुकर, रेडे, अस्वल, साळई, गोपुच्छ नांवाचे वानर, माकडें, हरिण, ससे इत्यादि क्षुद्र प्राणी मात्र त्याच्या आड निर्भयपणें संचार करीत राहिले.त्या गजेंद्राबरोबर दुसरे अनेक हत्ती व हत्तिणी चालत होत्या व त्याच्या मागोमाग मदस्रावी छावे येत होते.त्यांच्या गंडस्थलावरील मद भक्षण करण्यासाठीं भुंग्यांचे थवे त्यांच्यावर घिरट्या घालीत होते, आणि त्यांचे नेत्र मदानें धुंद झाले होते. अशारीतीनें हत्तिणींसह संचार करीत असतां, तो गजेंद्र सूर्याच्या तापानें संतप्त होऊन तृषाक्रांत झाला. तेव्हां कमळाच्या परागांनीं युक्त अशा सरोवरावरून येणाऱ्या वायूचा वास घेत घेत तो इतर हत्तींसह सरोवराकडे जाऊं लागला. तो चालत असतां त्याच्या वजनामुळें तो पर्वत वारंवार कांपूं लागला. शेवटीं पोकळ वेळू, भरीव वेळू, कांटेरी वृक्ष, वेलींच्या जाळ्या व करवंदीचीं झुडपें इत्यादि कडाकड मोडून टाकीत तो गजेंद्र त्या सरोवराजवळ मोठ्या त्वरेनें प्राप्त झाला ॥ २० ॥ २१ ॥ २२॥२३ ॥२४॥ नंतर त्या सरोवरांत प्रवेश करून प्रथम त्यानें स्नान केलें आणि श्रमपरिहार झाल्यावर सुवर्णकमळांतील परागांनीं सुगंधित झालेलें असें तें अमृताप्रमाणें मधुर व स्वच्छ पाणी त्यानें आपल्या सोंडेच्या टोकानें वर घेऊन यथेष्ट प्राशन केलें. मग गृहादि भोग्य वस्तूंवर आसक्त झालेल्या पुरुषाप्रमाणें भगवंताच्या मायेने मोहित झालेला तो मदोन्मत्त पण दयाळु गजेंद्र आपल्या शुंडाग्रानें पाणी बाहेर काढून हत्तिणींना व छाव्यांना तें पाजूं लागला व त्यांना स्नान घालूं लागला. पण थोडक्याच वेळांत आपणावर कोणतें संकट ओढवणार आहे हें त्याच्या लक्षांत आलें नाहीं ॥ २५ ॥ २६ ॥ त्याचा हा प्रकार चालला आहे इतक्यामध्यें दैवानें प्रेरणा केलेल्या कोणी एका बलाढ्य नक्रानें खालून त्याचा पाय धरिला. तेव्हां अकस्मात् संकटांत सांपडलेला तो बलवान् गजेंद्र, त्या संकटांतून आपल्याला सोडविण्याकरितां यथाशक्ती यत्न करूं लागला ॥ २७ ॥ पण तो महाबलाढ्य नक्र त्याला जोरानें आंत ओढूं लागला व त्यामुळें गजेंद्र अगदीं हैराण झाला. त्याला त्या स्थितींत पाहून मनामध्यें खिन्न झालेल्या हत्तिणी अगदीं दीन होऊन आक्रोश करूं लागल्या व त्याचे अनुयायी इतर हत्तीहि त्याला सोडविण्यास समर्थ झाले नाहींत.

॥ २८ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें महाबलिष्ठ असे ते नक्र व गजेंद्र एकमेकांबरोबर निकरानें युद्ध करून एकमेकांना ओढीत असतां हजार वर्षे निघून गेलीं. तेव्हां देवांनाहि तें मोठें आश्चर्य वाटलें ॥ २९ ॥ हजार वर्षे लोटल्यावरहि पुष्कळ काळपर्यंत नक्र गजेन्द्राला पाण्यामध्यें ओढीत असल्यामुळें गजेंद्र खिन्न झाला आणि त्याचा आहार बंद पडल्यामुळें त्याच्या मनाचा उत्साह, शरीराचें सामर्थ्य आणि इंद्रियांचें बल ह्यांचा अगदीं क्षय होत चालला. जलचर नक्राची मात्र उलट स्थिति झाली. त्याचा उत्साह, शरीरसामर्थ्य व इंद्रियबळ ही सर्वच वाढत होतीं ॥ ३० ॥ हे राजा, ह्याप्रमाणें दैवगतीनें नक्राच्या कचाट्यांत सांपडलेला गजेंद्र त्यांतून स्वत:ला सोडविण्यास असमर्थ झाला. आपल्या प्राणावरील हें संकट आहे असें जाणून आपली सुटका त्यांतून कशी करावी याविषयीं पुष्कळ विचार करीत राहिला. शेवटीं त्याला एकाएकीं एक बुद्धि सुचली ॥ ३१ ॥ तो मनांत म्हणाला, दैवाचा पाशच जणूं काय अशा या नक्रानें मला धरिलें आहे आणि मज आतुराला या पाशांतून सोडविण्यास माझे जातभाई हत्ती समर्थ नाहींत व मीहि समर्थ नाहीं; मग ह्या हत्तिणी कोठून असणार ? तरी आता मी ब्रह्मादिकांनाहि आश्रयभूत अशा त्या परमेश्वरालाच शरण जातों ॥ ३२ ॥ असह्य वेगानें चोहोंकडून चाल करीत येत असलेल्या बलिष्ठ मृत्युरूप महाभुजंगाला अत्यंत भ्याल्यामुळें शरण आलेल्या लोकांचें जो रक्षण करतो व प्राण्यांना मारणारा मृत्युसुद्धां ज्याच्या भयामुळें पळत सुटतो, त्या सर्वशक्तिमान् परमेश्वरालाच आम्हीं आतां शरण जातों ॥ ३३ ॥

## अध्याय दुसरा समाप्त

# अध्याय ३ रा

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षितराजा, ह्याप्रमाणें स्वत:च्या बुद्धीनें निश्चय केल्यावर गजेंद्रानें आपलें मन हृदयामध्यें स्थिर करून पूर्वजन्मामध्यें अभ्यास केलेल्या सर्वोत्कृष्ट स्तोत्राचा जप सुरू केला ॥ १ ॥

गजेंद्र म्हणाला—ज्या चिद्रूपी परमात्म्यापासून हें जें देहादिकाला चैतन्य प्राप्त होतें, त्या कारणरूपानें देहामध्यें प्रविष्ट असलेल्या षड्गुणैश्वर्यसंपन्न व प्रकृतिपुरुष परमेश्वराला मीं मनानें नमस्कार करितों ॥ २ ॥ ज्याच्या ठिकाणीं हें विश्व स्थित आहें, ज्यापासून हें उत्पन्न झालें आहे, ज्यानें हें केलें आहे, जो स्वत:च हें विश्व आहे आणि जो हा विश्वरूप कार्यापासून व त्याच्या महत्तत्त्वादि कारणांपासून भिन्न आहे, त्या स्वत:च सिद्ध परमेश्वराला मी शरण जातों ॥ ३ ॥ जो साक्षिरूप भगवान्, स्वत:चे ठिकाणीं आपल्या मायेनें रचिलेलें हें विश्व, सृष्टिसमयीं प्रगट होणारें व प्रलयकालीं लीन होणारें असें हें दोन्ही प्रकारचें कार्यकारणात्मक विश्व, आपल्या अलुप्त दृष्टीनें अवलोकन करितो, जो परप्रकाश अशा नेत्रादिकांचाहि प्रकाशक असून स्वयंप्रकाश आहे; असा तो परमात्मा माझें रक्षण करो ॥४॥ प्रलयकाळीं जेव्हां सर्व लोक, त्या लोकांचे पालक आणि त्या लोकांचीं सर्व कारणें हीं कालाच्या योगानें नाश पावलीं असतां; त्या वेळीं प्रवेश करण्यास अशक्य व अपार अशा अंधकाराच्या पलीकडेहि जो सर्वव्यापक प्रभु विराजमान होत असतो ॥ ५ ॥ ज्याचें स्वरूप, देव व ऋषि यांनाहि जाणतां येत नाहीं, त्या परमेश्वराला जाणण्यास अथवा त्याचें वर्णन करण्यास दुसरा प्राणी कोण बरें समर्थ होणार आहे ? ज्याचें चरित्र अगम्य आहे, असा तो परमेश्वर माझें रक्षण करो ॥ ६ ॥ अत्यंत सदाचारसंपन्न, नि:संग, सर्व भूतांच्या ठिकाणीं आत्मदृष्टि ठेवणारे व सर्वांचें हित करणारे असे मुनि ज्यांचें परममंगलकारक स्वरूप पाहण्याच्या इच्छेनें वनामध्यें राहून निरंतर ब्रह्मचर्यादि व्रतें आचरण करितात, तो परमेश्वर माझा रक्षणकर्ता असो ॥ ७ ॥ ज्याला जन्म, कर्म, नाम, रूप, गुण अथवा दोष ह्यांपैकीं कांहीं एक नसूनहि जो वेळोवेळीं लोकांच्या जन्ममरणाकरितां आपल्या मायेच्या योगानें त्या जन्मकर्मादिकांचा स्वीकार करितो, जो ब्रह्मस्वरूप असल्यामुळें रूपरहित आहे, जो अनंतशक्ति असल्यामुळें बहुरूपी आहे आणि ज्याचीं कर्में आश्चर्यकारक आहेत, अशा त्या परमेश्वराला वारंवार नमस्कार असो ॥ ८ ॥ ९ ॥ सर्वसाक्षिरूपानें असणारा, स्वयंप्रकाश आणि वाणीला, मनाला व चित्तवृत्तींना अगोचर अशा त्या परात्म्याला वारंवार नमस्कार असो ॥ १० ॥ फलेच्छारहित कर्मानें शुद्धचित्त झालेल्या पुरुषांनाच ज्याची प्राप्ति होते, त्या आनंदानुरूप व मोक्षाधिपति अशा परमे-

श्वराला नमस्कार असो ॥ ११ ॥ शांत, भयंकर व मूढ अशा सत्त्वादिगुणधर्मांचें अनुकरण करणारा भेदशून्य, सर्वत्र साम्य स्थितीनें वर्तणारा, आणि ज्ञानस्वरूप असा जो परमात्मा त्याला नमस्कार असो ॥ १२ ॥ क्षेत्रज्ञ, सर्वाध्यक्ष, सर्वसाक्षी, सकलजीवांस मूलकारणभूत आणि सर्वांच्या पूर्वींच विद्यमान असल्यामुळें मायेच्याहि उत्पत्तीस कारण, अशा तुला नमस्कार असो ॥ १३ ॥ जो सर्व इंद्रियांच्या विषयांस पाहणारा असून विषयांच्या ठिकाणीं ज्याचा सद्रूप आभास आहे, प्रतिबिंबानें जसें बिंबाचें अस्तित्व सूचित होतें त्याप्रमाणें मिथ्याभूत असलेल्या अहंकारादि प्रपंचावरून ज्याचें अस्तित्व सूचित झालें आहे, आणि ज्याचें ज्ञान सर्व इंद्रियवृत्तींच्या योगानें ज्ञात होत आहे, त्या तुला नमस्कार असो ॥ १४॥ जसें महासागरामध्यें सर्व प्रवाहांचें पर्यवसान होतें, तसें ज्याच्या ठिकाणीं सर्व शास्त्रांचें व वेदांचें पर्यवसान होतें, जो सर्वांचें कारण असून स्वतः निष्कारण आहे, आणि जो आश्चर्यांचें कारण असून मोक्षस्वरूप आहे त्या ईश्वराला नमस्कार असो ॥१५॥ जो गुणरूप अरणीनें आच्छादित झालेला ज्ञानाग्नि असून ज्याचें मन त्या गुणांच्या क्षोभरूप कार्याच्या ठिकाणीं पसरलें आहे आणि आत्मतत्त्वभावनेनें विधिनिषेधरूप शास्त्रांचा त्याग करणाऱ्या ज्ञानी पुरुषांच्या ठिकाणीं ज्याचा स्वतःच प्रकाश होत आहेत त्या परमेश्वराला मी नमस्कार करितों ॥ १६ ॥ जो अतिदयाळू असून भक्तांचें संकट निवारण करण्याविषयीं नित्य तत्पर असतो, जो मुक्त असल्यामुळें मजसारख्या शरणागत पशूच्या अज्ञानरूप पाशांचा समूळ नाश करण्यास समर्थ आहे, जो अंतर्यामिरूपानें सर्व प्राण्यांच्या मनांमध्यें राहून तेथें प्रतीत होणाऱ्या ज्ञानाचा दर्शक आहे, अशा सर्वव्यापी व षड्गुणैश्वर्यसंपन्न तुज भगवंताला नमस्कार असो ॥ १७ ॥ जो गुणसंगरहित असल्यामुळें अंतःकरणामध्यें असूनहि देह, पुत्र, आप्त, गृह, वित्त, आणि सेवक ह्यांच्या ठिकाणीं आसक्त असलेल्या पुरुषांना प्राप्त होण्यास अशक्य आहे व म्हणूनच देहादिकांविषयीं आसक्त नसलेले ज्ञानी पुरुष ज्याचें आपल्या हृदयामध्यें ज्ञानरूप, अचिंत्य ऐश्वर्यांनीं युक्त आणि सर्व निरंतर चिंतन करितात त्या परमेश्वराला नमस्कार असो ॥ १८ ॥ धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्यांची इच्छा करणारे पुरुष ज्याची सेवा करून इच्छित फळ प्राप्त करून घेतात, इतकेंच नाहीं तर जो भगवान् त्यांनीं न इच्छिलेलेहि भोग व सदृढ असा देहहि त्यांना देतो, तो अत्यंत दयाळू परमात्मा माझी मुक्तता करो ॥ १९ ॥ सर्वज्ञ अशा मुक्त पुरुषांची सेवा करणारे ज्यांचे एकनिष्ठ भक्त, चतुर्विध पुरुषार्थांमध्यें कोणत्याहि अर्थाची इच्छा करीत नाहींत, आणि अतिशय आश्चर्यकारक व मंगलकारक असें त्या भगवंताचें चरित्र गायन करीत करीत आनंदसागरामध्यें निमग्न होतात, त्या अविनाशी, सर्वव्यापी, सर्वोत्कृष्ट, ब्रह्मादिकांचाहि नियंता, अव्यक्त, अध्यात्मयोगानें प्राप्त होणारा, सूक्ष्म असल्यानें अतिदूर वस्तूप्रमाणें इंद्रियगोचर न होणारा, विनाशरहित, सर्वांच्या पूर्वीं विद्यमान, आणि परिपूर्ण अशा परमात्म्याचें मी स्तवन करितों ॥ २० ॥ ॥ २१ ॥ त्याच्या अगदीं स्वरुप अंशानें ब्रह्मादिदेव, वेद व चराचरात्मक लोक हे सर्व नामरूपभेदेंकरून उत्पन्न झाले आहेत ॥ २२ ॥ अग्नीच्या ज्वाळा अथवा सूर्याचे किरण जसे वरचेवर त्यांच्यापासून

उत्पन्न होऊन फिरून त्यांच्या ठिकाणीं लीन होतात, तसा बुद्धि, मन, इंद्रियें आणि शरीरें यांचा हा गुणप्रवाह ज्या स्वयंप्रकाश परमात्म्यापासून उत्पन्न होतो; जो देव नव्हे, असुर नव्हे, मानव नव्हे, पशु नव्हे, पक्षी नव्हे. नपुंसक नव्हे, पुरुष नव्हे, अथवा स्त्री नव्हे, कोणीहि प्राणी नव्हे. इतकेंच नाहीं तर गुण, कर्म, कार्य व कारण ह्यांपैकीं कांहींच नव्हें. सर्वांचा नाश झाला असतांहि जो अवशिष्ट राहातो त्या परमेश्वराचा नित्य जयजयकार असो. ॥ २३ ॥ ॥ २४ ॥ नक्रापासून देहाची मुक्तता होऊन वांचण्याचीहि मी इच्छा करीत नाहीं; कारण आत व बाहेर अविवेकानें व्याप्त असलेल्या हत्तीच्या योनीशीं मला येथें काय प्रयोजन आहे? कालेंकरूनहि ज्याचा नाश होत नाहीं, त्या आत्मप्रकाशाला आच्छादित करणाऱ्या अज्ञानाची निवृत्ती व्हावी एवढीच मी इच्छा करितों ॥ २५ ॥ केवळ मुमुक्षु असा मी विश्वोत्पादक, जगन्मूर्ती, जगाहून निराळा, जगद्रूप क्रीडासाधनानें युक्त, जगदात्मकरूप व जन्मादिविकारशून्य अशा उत्कृष्ट आश्रयरूपी ब्रह्माला केवळ नम्र आहें ॥ २६ ॥ भक्तियोगानें ज्यांचीं कर्में भाजलेल्या बीजाप्रमाणें दग्ध झालीं आहेत, ते योगीलोक योगानें शुद्ध झालेल्या हृदयामध्यें ज्याला पहातात, त्या योगेश्वराला मी नमस्कार करितों ॥ २७ ॥ ज्याच्या सत्त्वादि तिन्ही शक्तींचा वेग असह्य आहे, जो सर्व इंद्रियांच्या शब्दादि विषयांच्यारूपानें बाह्यदृष्ट्या प्रतीत होत आहे, विषयोन्मुख इंद्रियांनीं युक्त असलेल्या लोकांना ज्यांचा मार्ग उपलब्ध होत नाहीं, जो शरणागतांचा पालक आहे आणि शक्तीचा अंत नाहीं, त्या तुला नमस्कार असो ॥ २८॥ ज्याच्या मायेनें उत्पन्न झालेल्या अहंकाराच्या योगानें आच्छादित झालेल्या स्वरूपभूत आत्म्याला हे प्राणी जाणत नाहींत आणि ज्याचा प्रभाव उल्लंघन करण्यास अशक्य अशा त्या भगवंताच्याच आश्रयानें मी राहिलों आहें ॥ २९ ॥

शुकाचार्य म्हणाले,--- हे राजा, त्या गजेंद्रानें भेदशून्य अशा परमात्म्याचें ह्याप्रमाणें वर्णन केलें असतां नाना प्रकारच्या आपल्या मूर्तिभेदाचा अभिमान बाळगणाऱ्या ब्रह्मादिकांपैकीं कोणीहि त्याच्याजवळ आला नाहीं असें पाहून सर्वदेवमय भगवान् श्रीहरि तेथें प्रगट झाला ॥ ३० ॥

गजेंद्र अशा प्रकारें पीडित झालेला आहे असें जाणून व त्यानें केलेलें स्तोत्र श्रवण करून, तो जगन्निवास परमात्मा वेदमय गरुडावर आरूढ झाला आणि हस्तामध्यें चक्रायुध घेऊन, स्वतःचें स्तवन करीत असलेल्या देवांसह जेथें गजेंद्र होता तेथें येऊन पोंचला ॥ ३१ ॥ हे राजा, त्या वेळीं सरोवरामध्यें महाबलाढ्य नक्रानें पाय धरिल्यामुळें पीडित झालेल्या त्या गजेंद्रानें, हातांमध्यें सुदर्शन धारण केलेल्या व आकाशामध्यें गरुडावर आरूढ झालेल्या श्रीहरीला पाहून त्याला अर्पण करण्याकरितां आपल्या शुंडाग्रानें कमळें घेऊन तीं वर फेकिलीं; आणि हे " षड्गुणैश्वर्यसंपन्न जगद्गुरो, नारायणा, तुला नमस्कार

असो " असे शब्द मोठ्या संकटानें उच्चारिले ॥ ३१ ॥ तेव्हां त्या पीडित झालेल्या गजेंद्राला पाहतांक्षणींच, गरुडहि मंदगामी आहे अशा बुद्धीनें झटकन् त्यावरून खालीं उतरून, जन्मादिविकाररहित अशा त्या श्रीहरीनें मोठ्या कृपेनें नक्रासह त्या गजेंद्राला सत्वर सरोवराच्या बाहेर काढिलें आणि चक्राच्या योगानें नक्राचें मुख विदारण करून, सर्व देव पाहात असतां गजेन्द्राला मुक्त केलें ॥ ३३ ॥

## तिसरा अध्याय समाप्त

# अध्याय ४ था

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, गजेन्द्राला मुक्त केल्याबरोबर ब्रह्मदेव, शंकर इत्यादि देव, ऋषि आणि गंधर्व हे श्रीहरीच्या त्या पराक्रमाची प्रशंसा करीत त्याच्यावर पुष्पवृष्टि करूं लागले ॥ १ ॥ स्वर्गांत दुंदुभि वाजूं लागल्या, गंधर्व नृत्य व गायन करूं लागले आणि ऋषि, चारण व सिद्ध हे त्या पुरुषोत्तमाची स्तुति करूं लागले ॥ २ ॥ असो. जो नक्र म्हणून होता, तो पूर्वजन्मीं हूहूनामक श्रेष्ठ गंधर्व असून देवलमुनीच्या शापामुळें त्याला नक्राचा जन्म प्राप्त झाला होता. तोहि या समयीं तत्काल शापापासून मुक्त झाला आणि अद्‌भुत रूप प्राप्त झालें आणि यशाचें केवळ आश्रयस्थान, वर्णनीय गुण व पवित्र कथा ह्यांनीं युक्त, असा जो श्रेष्ठकीर्ति परमेश्वर, त्याला मस्तकानें प्रणाम करून तो त्याचें माहात्म्य गाऊं लागला. ॥ ३ ॥ ४ ॥ ह्याप्रमाणें परमेश्वरानें कृपा केली असतां, तो हूहू गंधर्व त्या परमेश्वराला प्रदक्षिणा व नमस्कार करून सर्व लोकांसमक्ष आपल्या स्थानाकडे निघून गेला ॥ ५ ॥ इकडे तो गजेन्द्रहि भगवंताच्या स्पर्शामुळें अज्ञानरूप बंधनापासून मुक्त झाला आणि भगवंताच्या रूपासारखेंच रूप त्याला प्राप्त होऊन तो पीतांबरधारी व चतुर्भुज झाला ॥ ६ ॥ हे राजा, तो गजेन्द्र पूर्वजन्मीं द्रविडदेशनिवासी अशा लोकांमध्यें श्रेष्ठ आणि विष्णुव्रताचें एकनिष्ठेनें आचरण करणारा इंद्रद्युम्न नांवाचा पांड्य देशाचा प्रसिद्ध राजा होता ॥ ७ ॥ एकदां असें झालें कीं, मलयपर्वतावर आपल्या आश्रमामध्यें राहात असतां, तो जटाधारी तपोनिष्ठ इंद्रद्युम्न राजा, पूजेचा समय झाला असतां स्नान करून, अंतःकरणाचा निग्रह करून व मौनव्रत धारण करून सर्वसमर्थ आणि सर्व दुःख-निवारक अशा भगवान् अच्युताचें पूजन करीत होता. इतक्यांत महायशस्वी अगस्त्य ऋषी आपल्या शिष्यांसह फिरत फिरत तेथें आला. तेव्हां इंद्रद्युम्न राजा आपल्याला सामोर आला नाहीं, आपला सन्मान न करितां एकांतामध्यें स्वस्थ बसला आहे असें पाहून, तो ऋषी क्रुद्ध झाला आणि त्यानें त्याला शाप दिला. तो म्हणाला,—या दुरात्म्या दुष्ट राजाच्या बुद्धीला चांगलें वळण लागलेलें नसून हा ब्राह्मणांचा अपमान करीत आहे, ह्याकरितां तो अज्ञानरूप अंधकारांत पडो, आणि हत्ती जसा गर्विष्ठ असतो, तसाच हा असल्यामुळें याला हत्तीचा जन्म प्राप्त होवो ॥ ८ ॥ ९ ॥ १० ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें शाप देऊन भगवान् अगस्त्यमुनि अनुयायी शिष्यगणांसह निघून गेला असतां, इकडे राजर्षि इंद्रद्युम्नहि तो शाप म्हणजे आपल्या प्रारब्धाचें कर्मफळ आहे असें जाणून आत्मस्वरूपाच्या स्मृतीचा नाश करणाऱ्या गजयोनींत जन्मास आला; परंतु भगवंताच्या पूजेच्या प्रभावामुळें त्या गजयोनीमध्येंहि त्याला पूर्वीची स्मृति राहिली ॥ ११ ॥ १२ ॥ असो. ह्या प्रकारें कमळनाभ भगवंतानें

गजेंद्राची मुक्तता करून त्याला आपल्या पार्षदांमध्यें स्थान दिलें आणि मग आपल्या त्या सर्व पार्षदांसह तो गरुडावर आरूढ होऊन अलौकिक अशा आपल्या वैकुंठलोकाला गेला. त्या वेळीं गंधर्व, सिद्ध आणि देव त्या भगवंताचें तें गजेंद्रमोक्षरूप चरित्र नृत्य व गायन करून वर्णूं लागले ॥ १३ ॥ हे राजा, हा जो गजेंद्रमोक्षरूप कृष्णाचा पराक्रम मीं तुला सांगितला, तो जे श्रवण करितात, त्या लोकांना स्वर्गाची प्राप्ती होते, त्यांचें यश वृद्धि पावतें, त्यांच्या कलिसंबंधी पापाचा नाश होतो व स्वप्नाचीहि त्यांना पीडा होत नाहीं ॥ १४ ॥ हें पुण्यकारक आख्यान धर्मादि पुरुषार्थांची इच्छा करणारे ब्राह्मण प्रातःकाळीं उठून व स्नानादिकांनीं शुद्ध होऊन दुष्ट स्वप्नांच्या शांतिकरितां पठण करितात ॥ १५ ॥ हे कौरवश्रेष्ठा, गजेंद्राची मुक्तता केल्यानंतर सर्वभूतस्वरूपी व सर्वव्यापी श्रीहरि प्रसन्न होऊन सर्व प्राणिमात्र श्रवण करीत असतां त्या गजेंद्राशीं बोलूं लागला ॥ १६ ॥

श्रीभगवान् म्हणाला,—हे वत्सा, जे पुरुष मीं, तूं, हें सरोवर, त्रिकूटपर्वत, त्यांतील गुहा, वनें, वेत, पोकळ कळक आणि भरीव कळक ह्यांचीं बेटें, देववृक्ष, हीं त्रिकूटपर्वताचीं शिखरें, ब्रह्मदेव, मी व शिव त्यांचीं निवासस्थानें, क्षीरसागर व दैदीप्यमान श्वेतद्वीप अशीं माझीं दोन प्रिय स्थानें, श्रीवत्सलांछन, कौस्तुभमणी, वैजयंती माळा, माझी कौमोदकी गदा, सुदर्शन चक्र, पांचजन्य शंख, पक्षिराज गरुड, माझा अंशावतार असा शेष, माझ्या आश्रयाला असणारी लक्ष्मीदेवी, ब्रह्मदेव, नारदऋषि, शंकर, प्रल्हाद, मत्स्य, कूर्म व वराह इत्यादिक अवतारांत मीं केलेलीं अत्यंत पुण्यकारक कर्में, सूर्य, चंद्र, अग्नि, ॐकार, माया, गाई, ब्राह्मण, अविनाशी त्रिकालाबाधित धर्म, सोम व कश्यप यांच्या भार्या झालेल्या दक्षाच्या कन्या, गंगा, सरस्वती, नंदा, यमुना, ऐरावत, ध्रुव, सात महर्षि आणि पवित्रकीर्ति असे धार्मिक मनुष्य, तशाच माझ्या अनेक विभूति, यांचें जे पुरुष प्रभातकाळीं उठून व शुचिर्भूत होऊन एकाग्र अंतःकरणानें स्मरण करितात, ते सर्व पातकांपासून मुक्त होतात ॥ १७ ॥ १८ ॥ १९ ॥ २० ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥ २४ ॥ तसेंच प्रभातकाळीं उठून जे पुरुष ह्या तूं केलेल्या स्तोत्रानें माझें स्तवन करतील त्यांना अंतकाळीं निर्मळ गति देईन ॥ २५ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें त्या गजेंद्राशीं भाषण करून व आपला सर्वोत्कृष्ट शंख वाजवून देवगणांना आनंद देणारा भगवान् हृषीकेश वैकुंठास जाण्याकरितां गरुडावर आरूढ झाला ॥ २६ ॥

**चौथा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ५ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, पुण्यकारक व पापनाशक असा हा श्रीहरीचा गजेंद्रमोक्षरूप पराक्रम मी तुला कथन केला. आतां रैवतमन्वंतराचें वृत्त श्रवण कर ॥ १ ॥ तामसमनूचा सख्खा भाऊ जो रैवत तो पांचवा मनु होय. त्याचे अर्जुनप्रमुख बलिविंध्यादिक पुत्र होते ॥ २ ॥ हे राजा, या रैवतमन्वंतरांत विभुनामक इंद्र, भूतरय इत्यादि देवगण आणि हिरण्यरोमा, वेदशिरा, ऊर्ध्वबाहु, देवबाहु, सुधर्मा, पर्जन्य व महामुनि हे सप्तर्षि, असे अधिकारी पुरुष होते ॥ ३ ॥ शुभ्रनामक ऋषि व त्याची विकुंठानामक पत्नी ह्या उभयतांचे ठिकाणीं वैकुंठनामक श्रेष्ठ देवांसह स्वतः भगवान् आपल्या अंशानें अवतीर्ण होऊन वैकुंठ ह्या नांवानें प्रसिद्ध झाला ॥ ४ ॥ त्या भगवंतानें रमादेवीच्या प्रार्थनेवरून तिचें प्रिय करण्याच्या इच्छेनें सर्व लोकांना पूज्य अशा वैकुंठलोकाची रचना केली. त्या वैकुंठनामक श्रीहरीचा पराक्रम, ब्राह्मणभक्ति इत्यादिक गुण आणि त्याच्या मोठ्या उत्कर्षाचा वृत्तान्त, हीं मीं सर्व तुला संक्षेपानें पूर्वी कथन केलींच आहेत; कारण विष्णूचे संपूर्ण गुण कोण वर्णन करील ? ते वर्णन करणें म्हणजे पृथ्वीच्या रजःकणांची गणना करणेंच होय ॥ ५ ॥ ६ ॥ असो. पुढें चक्षूचा पुत्र चाक्षुष हा सहावा मनु झाला. पुरु, पुरुष व सुद्युम्न ज्यांमध्यें प्रमुख आहेत असे त्याला पुत्र झाले ॥ ७ ॥ हे राजा, त्या मन्वंतरामध्यें मंत्रद्रुमनामक इंद्र, आप्यादिक देवगण आणि हविष्मान्, वीरक, सुमेधा, उत्तम, मधु, अतिनामा व सहिष्णु हे सात मुनि अशी व्यवस्था होती ॥ ८ ॥ या मन्वंतरामध्यें वैराज व त्याची पत्नी संभूति त्या उभतांपासून नाना प्रकारच्या क्रीडा करणारा जगत्पालक भगवान् पुत्ररूपानें आपल्या अंशानें अवतीर्ण होऊन अजित नांवानें प्रसिद्ध झाला ॥ ९ ॥ हे राजा, या अजितानें क्षीरसागराचें मंथन करून देवांना अमृत मिळवून दिलें व कांसवाचें रूप घेऊन पाण्यामध्यें फिरणारा मंदरपर्वत आपल्या पाठीवर धारण केला ॥ १० ॥

राजा म्हणाला, —हे शुकाचार्या, भगवंतानें हें जें क्षीरसागराचें मंथन केलें तें कसें व कशाकरितां केलें ? तसेंच त्यानें कूर्मरूपानें मंदराचल पाठीवर धरिला तो कां ? देवांनीं अमृत प्राप्त करून घेतलें तें कोणत्या हेतूनें? त्या मंथनापासून अमृताखेरीज दुसरें काय काय उत्पन्न झालें ? हें व तत्संबंधी भगवंताचें सर्व अद्भुत कर्म कथन कर ॥ ११ ॥ १२ ॥ कारण, हे मुने, भक्तपालक भगवंताचा माहिमा तुम्हीं वर्णन करूं लागलां म्हणजे तो कितीहि ऐकिला तरी तापत्रयानें दुःखित झालेलें माझें चित्त तृप्तच होत नाहीं ॥ १३ ॥

सूत म्हणाला,—हे शौनक हो, ह्याप्रमाणें प्रश्न केला असतां, त्याचा आदरपूर्वक स्वीकार करून शुकाचार्यांनीं श्रीहरीचें माहात्म्य त्याला सांगण्यास प्रारंभ केला ॥ १४ ॥

शुकाचार्य म्हणाले, –देव व असुर यांच्या युद्धांमध्यें असुरांनीं सोडिलेल्या तीक्ष्ण आयुधांचे प्रहार लागून पुष्कळ देव गतप्राण होऊन पडले व ते पुनः उठूं शकले नाहींत ॥ १५ ॥ तसेंच दुर्वासमुनीच्या शापामुळें इंद्रासह तीन्ही लोक निस्तेज झाले, आणि तेणेंकरून यज्ञयागादि कर्मे नष्ट झालीं. तेव्हां इंद्रवरुणप्रभृति देवांनीं हा प्रकार पाहून त्याच्या प्रतिकारार्थ नाना प्रकारच्या युक्त्या योजण्याचा आपल्यामध्यें विचार चालविला; पण त्यांना गतवैभव प्राप्त होण्याचा निश्चित असा कांहींच उपाय सुचेना. तेव्हां ते मेरुपर्वताच्या शिखरावर ब्रह्मदेवाच्या सभेमध्यें गेले आणि ब्रह्मदेवाला प्रणाम करून झालेला सर्व वृत्तांत त्यांनीं त्याला कथन केला ॥ १६ ॥ १७ ॥ १८ ॥ हे राजा, इंद्रवायुप्रभृति देव निर्मळ व निस्तेज झालेले असून लोक अमंगल स्थितीस पोंचले आहेत आणि त्याच्या उलट असुर तेजोबलादिकांनीं युक्त झाले आहेत, असें पाहून ब्रह्मदेवानें एकाग्र मनानें भगवान् पुरुषोत्तमाचें स्मरण केलें आणि त्या श्रीहरीला शरण गेलों असतां आपल्याला पूर्वीप्रमाणें सर्व संपत्ति प्राप्त होईल असा त्यानें मनाशीं निश्चय केला. या निश्चयामुळें त्याचें मुख प्रफुल्लित झालें आणि तो सुरश्रेष्ठ भगवान् ब्रह्मदेव त्या देवांना म्हणाला ॥ १९ ॥ ॥२०॥ हे देव हो, मी शंकर तुम्हीं व असुर, दैत्य इत्यादि सर्व,तसेंच पशु, पक्षी, वृक्ष व स्वेदज प्राणी हे सर्व ज्याच्या अंशाचे अंश अशा मरीचि आदिकरून प्रजापतींनीं उत्पन्न केले, त्याच अक्षय परमात्म्याला आपण शरण जाऊं या॥२१॥ हे देव हो, त्या परमात्म्याला कोणाचा वध, रक्षण, उपेक्षा अथवा आदर करावयाचा नाहीं व तो कोणाचा पक्षपातीहि नाहीं. तथापि जगताची उत्पत्ति,स्थिति व लय करण्याकरितां योग्यकालीं तो अनुक्रमानें रज, सत्त्व व तम ह्या गुणांचा स्वीकार करितो ॥ २२ ॥ प्राण्यांच्या कल्याणाकरितां सत्त्वगुणांचा स्वीकार करणाऱ्या भगवंताची जगाच्या स्थैर्याचें रक्षण करण्याची ही वेळ आहे. यास्तव त्या जगद्गुरूला आपण शरण जाऊं या, म्हणजे तो देवांचा प्रिय परमेश्वर, त्याचे सेवक जे आपण, त्या आम्हां सर्वांचें कल्याण करील ॥ २३ ॥

शुकाचार्य म्हणाले,— हे शत्रुदमना, ह्याप्रमाणें देवांना सांगून ब्रह्मदेव श्रीहरीचें बसतिस्थान जो क्षीरसमुद्र त्याच्या तीरीं गेला ॥ २४ ॥ हे राजा, त्या ठिकाणीं गेल्यावर ज्याची कीर्ति पूर्वीं ऐकिलेली होती, पण जो प्रत्यक्ष दृष्टीस पडला नव्हता, अशा भगवंताला उद्देशून ब्रह्मदेव एकाग्र मन करून दिव्य अशा वैदिक मंत्रानीं स्तुति करूं लागला ॥ २५ ॥

ब्रह्मदेव म्हणाला,– हे देवा, तूं मनापेक्षांहि वेगवान् व वाणीनें वर्णन करण्यास अतर्क्य आहेस. तूं उपाधिशून्य, सर्वांतर्यामी, अनंत, आद्य, विकारशून्य, सत्यस्वरूप, सर्व देवांत श्रेष्ठ आहेस. संकटकाळीं सर्व प्रकारें आमचें रक्षण करीत असल्यामुळें आश्रय करण्यास योग्य आहेस. तुला आम्ही नमस्कार करितों ॥ २६ ॥ तूं प्राण, मन, बुद्धि आणि अहंकार ह्यांचा ज्ञाता असून शब्दादि विषय व इंद्रियें ह्यांच्या रूपानें भासमान होणारा आहेस. तूं देहशून्य, अज्ञानरहित, अक्षय, आकाशाप्रमाणें सर्वव्यापी, तीन्ही युगांमध्यें प्रगट होणारा आणि ज्याच्या ठिकाणीं जीवाच्या पक्षपाती अशा अविद्या व तिला निवृत्त

करणारी विद्या, ह्या दोन्हीहि नाहींत, अशा तुला आम्ही शरण आलों आहों ॥ २७ ॥ हे परमेश्वरा, ज्यामध्यें मन हें मुख्य आहे, ज्याला दहा इंद्रियें व पांच प्राण अशा पंधरा आरा आहेत ज्याची गति शीघ्र आहे ज्याच्या मध्यभागीं सत्त्वादि तीन गुण हेच तुंबे आहेत, जे विद्युल्लतेसारखे चंचल असून आठ प्रकृति ह्या ज्याच्या धांवा आहेत आणि ज्याला मायेच्या योगानें गति मिळाली आहे, असें हें जीवाचें देहरूप चक्र ज्याच्या आश्रयानें राहिलें आहे, त्या तुज सत्यस्वरूप परमात्माला मी शरण आलों आहें ॥ २८ ॥ ज्ञान हेंच ज्याचें मुख्य स्वरूप आहे, जो प्रकृतीच्या पलीकडे असून अदृश्य निर्विकल्प आहे, देश किंवा काल यांची मर्यादा नसलेलें ब्रह्म ज्याचें स्वरूप तसेंच जो जीवाच्या अंतर्यामीं नियन्तृरूपानीं असतो विवेकी पुरुष योगसाधानें ज्याची उपासना करितात ॥ २९ ॥ ज्याच्या मायेनें जन मोहित होऊन आत्मस्वरूप जाणत नाहींसे होतात; ज्या मायेचें कोणींहि अतिक्रमण करू शकत नाहीं; परंतु ज्यानें आपली शक्ति व तिचे गुण ह्यांना सर्वस्वी जिंकिलें आणि जो सर्व भूतांच्या ठिकाणीं सारखा आहे, त्या परमेश्वराला आम्हीं नमन करितों ॥ ३० ॥ ज्याच्यामध्यें रजोगुण व तमोगुण मुख्य आहेत अशा असुरांची तर गोष्ट राहो; परंतु ज्यांच्या प्रियतनुरूप सत्त्वगुणापासून उत्पन्न झालेले असे हे आम्ही देव व ऋषि, सत्ता व प्रकाश ह्यांच्या योगानें आंत व बाहेर प्रकट असलेलें ज्याचें निरूपाधिक स्वरूप जाणत नाहीं, त्याला आम्ही नमस्कार करितों ॥ ३१ ॥ जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज अशा चार प्रकारच्या भूतसृष्टींन युक्त अशी उत्पन्न केलेली ही पृथ्वी ज्याचे पाय आहेत आणि जो अचिंत्यैश्वर्यसंपन्न, नित्य स्थिरस्वरूपी व स्वतंत्र आहे, तो महापुरुष भगवान् आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ३२ ॥ ज्यापासून तिन्ही लोक व सर्व लोकपाल उत्पन्न होतात, वांचतात व वृद्धि पावतात, असें जें महाशक्तियुक्त उदक ज्याचें रेत आहे, तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न असा परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ३३ ॥ ज्याला देवाचें अन्न, बल व आयुष्य असें म्हणतात, जो प्रजांची वृद्धि करणारा व वृक्षांचा अधिपति आहे, असा तो चंद्र ज्याचें मन आहे, तो अचिंत्यैश्वर्यप्रसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ३४ ॥ यज्ञादिकर्माच्या अनुष्ठानाकरितां ज्याची उत्पत्ति झाली आहे, जो उदरामध्यें जिरण्यास योग्य अशा अन्नादिकांचें पचन करीत असून समुद्रामध्येंहि बाडवरूपानें उदकाचें शोषण करितो, आणि ज्याच्यापासून द्रव्य उत्पन्न झालें आहे असा अग्नि ज्याचें मुख आहे तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ३५ ॥ वेदत्रयाचें स्वरूप, ब्रह्माचें उपासनास्थान, अर्चिरादि मार्गाची अधिष्ठात्री देवता, मुक्तीचें द्वार, अमृतस्वरूपी व कालात्मक असल्यामुळें मृत्युरूपी असा जो हा सूर्य ज्याची दृष्टी आहे, तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ३६ ॥ जो चराचर प्राण्यांची मानसिक शक्ति असून शारीर, बल आणि इंद्रियसामर्थ्य ह्या धर्मांनीं युक्त आहे व सार्वभौम राजाचे सेवक जसे त्याच्या आहेत राहातात तसे आम्ही ज्याच्या अंकित आहों व हा प्राणरूप वायु ज्याच्या प्राणापासून उत्पन्न झाला, तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ३७ ॥ ज्याच्या श्रवणेंद्रियापासून दिशा उत्पन्न झाल्या, ज्याच्या हृदयापासून देहगत छिद्रें उत्पन्न झालीं

आणि प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय हे दहा प्राण, इंद्रियें, मन आणि शरीर ह्यांना आश्रयभूत असें आकाश, ज्याच्या नाभीपासून उत्पन्न झालें आहे, तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ३८ ॥ ज्याच्या बलापासून महेंद्र, प्रसादापासून सर्व देव, क्रोधापासून रुद्र, बुद्धीपासून ब्रह्म देहच्छिद्रापासून छंद व ऋषि आणि शिश्नापासून प्रजापति हे उत्पन्न झाले, तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ३९ ॥ ज्याच्या वक्षःस्थलापासून महालक्ष्मी, छायेपासून पितर स्तनापासून धर्म, पृष्ठभागापासून अधर्म, मस्तकापासून स्वर्ग आणि क्रीडेपासून अप्सरा उत्पन्न झाल्या, तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ४० ॥ ज्याच्या मुखापासून ब्राह्मण व इंद्रियांनीं न समजणाऱ्या अर्थाचा बोध करणारा वेद, बाहूपासून क्षत्रिय व प्रजापालनसामर्थ्य, मांड्यांपासून वैश्य व त्यांचे व्यवहारनैपुण्य आणि चरणांपासून वेदव्यतिरिक्त शुश्रुषावृत्ति व तिच्यावर उपजीविका करणारा शूद्र ह्यांची उत्पत्ति झाली, तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ४१ ॥ ज्यांच्या अधरोष्ठापासून लोभ, उत्तरोष्ठापासून प्रीति, नासिकेपासून कांति, स्पर्शापासून पशूंना योग्य असा काम, भ्रुकुटीपासून यम आणि पापण्यापासून काल ह्यांची उत्पत्ति झाली, तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ४२ ॥ पंचमहाभूतें, काल, कर्म, सत्त्वादि गुण व भौतिक प्रपंच मिळून झालेलें व विद्वान् लोकांनीं त्याज्य मानिलेलें असें हें अतर्क्य व कार्य-कारणात्मक सर्व जग, ज्याच्या योगा मायेनें उत्पन्न केलें असें म्हणतात, तो अचिंत्यैश्वर्यसंपन्न परमात्मा आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ४३ ॥ ज्याचें मन स्वानंदलाभानेंच परिपूर्ण झालें आहे, ज्याच्या ठिकाणीं सर्व शक्ति लय पावल्या आहेत आणि जो मायेनें निर्मिलेल्या सत्त्वादिगुणांचें दर्शन करीत असतांहि त्यांवर आसक्त होत नाहीं, अशा त्या वायूप्रमाणें सर्वत्र संचार करणाऱ्या पण कोठेंच आसक्त न होणाऱ्या परमेश्वराला नमस्कार असो ॥ ४४ ॥ हे परमेश्वरा, तुझें हास्ययुक्त मुखकमल अवलोकन करण्याची इच्छा धरून आम्ही तुला शरण आलों आहों; तरी आमच्या इंद्रियांना गोचर होईल असें आपलें स्वरूप तूं आम्हांला दाखीव ॥ ४५ ॥ हे विभो, वेळोवेळीं आपल्या इच्छेनुसार विविध स्वरूपें धारण करून सहन करण्यास अशक्य असें अद्‌भुत कर्म तूं स्वतः करीत आहेस ॥ ४६ ॥ देहाभिमानी व विषयासक्त अशा लोकांचीं कर्मे अत्यंत क्लेशदायक व अल्पफलयुक्त होतात; किंबहुना सर्वथा निष्फळहि होतात; पण तुला अर्पण केलेलें कर्म मात्र कधीं निष्फळ होत नाहीं ॥ ४७ ॥ अत्यल्प व आभासमात्र असलेलेंहि कर्म ईश्वराला अर्पण केलें असतां त्या-पासून आयास होत नाहींत; कारण, तो ईश्वरच पुरुषाचा आत्मा, प्रिय व हितकारक

आहे ॥ ४८ ॥ ज्याप्रमाणें वृक्षाच्या मुळांशीं पाणी शिंपलें असतां त्याच्या लहानमोठ्या खांद्यांनाही तें दिल्यासारखें होतें; त्याप्रमाणें विष्णूचें आराधन केलें असतां सर्व प्राण्यांचें व आपलें स्वत:चेंहि आराधन केल्यासारखें होतें ॥ ४९ ॥ हे परमेश्वरा, तुझे पराक्रम अंतर्क्य असून तूं अनंत, निर्गुण व गुणांचा नियंता आहेस आणि सांप्रत तूं सत्त्वगुणाचा अंगीकार केला आहेस. तुला आमचा नमस्कार असो ॥ ५० ॥

## अध्याय पांचवा समाप्त

---

# अध्याय ६ वा

शुक्राचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें देवगणांनीं स्तुति केली असतां, सहस्र सूर्यांच्या उदयाप्रमाणें ज्याची कांति आहे असा दुःखहर्ता भगवान् ईश्वर त्यांच्यापुढें प्रगट झाला ॥ १ ॥ त्याच्या तेजाच्या योगानें त्यांचे नेत्र दिपून गेले व त्यांना आकाश, दिशा, पृथ्वी व आपला देह हींसुद्धां दिसत नाहींशीं झालीं. मग तो सर्वव्यापी ईश्वर कोठून दिसणार? ॥ २ ॥ असो. त्या वेळीं शंकरासह ब्रह्मदेवानें जी भगवंताची मूर्ति अवलोकन केली, ती निर्मळ असून पाचेसारखी श्यामवर्ण होती व तिचे नेत्र कमलगर्भाप्रमाणें आरक्त होते ॥ ३ ॥ ती तापलेल्या सुवर्णाप्रमाणें पिवळ्या वर्णाच्या रेशमी वस्त्रानें युक्त व तिचे सर्व अवयव प्रसन्न व मनोहर असून उत्तम मुख व सुंदर भ्रुकुटी ह्यांनीं ती युक्त होती ॥ ४ ॥ तिच्या मस्तकावर महारत्नांनीं युक्त असा मुकुट होता, ती बाहुभूषणांनीं भूषित होती व कानांतील कुंडलांच्या योगानें अत्यंत प्रकाशित झालेल्या गालांनीं त्या मूर्तीचें मुखकमल फारच शोभायमान दिसत होतें. कमरेंत कमरपट्टा, हातांमध्यें कडींतोडे, कंठामध्यें हार व पायांमध्यें नूपुरें असून, तिनें कंठामध्यें कौस्तुभमणी धारण केला होता. तिच्या वक्षःस्थलावर लक्ष्मी होती .त्या मूर्तीनें गळ्यामध्यें वनमाला धारण केली होती आणि मूर्तिमंत सुदर्शनादि शस्त्रें तिची उपासना करीत होतीं. अशा त्या परमपुरुषाच्या मूर्तीला अवलोकन करून सर्व देवांनीं तिला साष्टांग नमस्कार केला आणि सर्व देवांसह व शंकरासह ब्रह्मदेव तिची स्तुति करूं लागला ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥

ब्रह्मदेव म्हणाला,— हे प्रभो , तूं निर्गुण, उत्पत्तिस्थितिलयशून्य, अपार, मोक्षसुखाचा समुद्र, परमाणूपेक्षांसुद्धां सूक्ष्म व अचिंत्य प्रभावानें युक्त असून तुझ्या स्वरूपाला इयत्ता नाहीं अशा तुला आमचा नमस्कार असो ॥ ८ ॥ हे पुरुषश्रेष्ठा विधात्या, तुझें हें स्वरूप वेदानें तंत्रांत सांगितलेल्या साधनांनीं कल्याणेच्छु पुरुषांनीं सर्वदा पूजन करण्यास योग्य आहे. अहो! खरोखर विश्वमूर्ति अशा तुझ्या स्वरूपांत आम्हां सर्व देवगणांसह तिन्ही लोक माझ्या दृष्टीस पडत आहेत ॥ ९ ॥ 'हे परमेश्वरा, ज्याप्रमाणें माती हीच घटाचा आदि, अंत व मध्य असत्ये त्याप्रमाणें तूं ह्या जगताचा आदि, अंत व मध्य असून प्रकृतीच्याहि पलीकडचा आहेस. हें जग सृष्टीच्या पूर्वी स्वतंत्र अशा तुझ्याच ठिकाणीं लीन होतें. सृष्टिकालीं तुझ्या ठिकाणींच त्याचें अस्तित्व आहे व सृष्टीच्या अंतींहि तुझ्यांतच तें लय पावेल ॥ १० ॥ हे देवा, आपल्या स्वाधीन असलेल्या मायेच्या योगानें हें विश्व तूं निर्माण करून त्यामध्यें प्रविष्ट झाला आहेस, म्हणून गुणांच्या परिणामकाळींहि सावधानचित्त असलेले शास्त्रज्ञ व विवेकी पुरुष मनोरम दृष्टीनें निर्गुण अशा तुलाच अवलोकन करितात ॥ ११ ॥ काष्ठामध्यें असलेला अग्नि, गाईच्या ठिकाणीं असलेलें तूप, भूमीमध्यें असलेलें अन्न व

उदक व उद्योगांत असलेली उपजीविका हीं मनुष्य जसा अनुक्रमें मंथन, दोहन, कर्षण, खनन आणि व्यापार इत्यादि उपायांनीं प्राप्त करून घेतो, त्याप्रमाणें गुणांच्याच ठिकाणीं असलेल्या तुला बुद्धीच्या योगानें विवेकी पुरुष प्राप्त करून घेतात व तुझ्याशीं संभाषणहि करितात ॥ १२ ॥ हे प्रभो पद्मनाभा, ज्याप्रमाणें वणव्यानें पीडिलेले हत्ती गंगाजल प्राप्त झालें असतां सुखी होतात, त्याप्रमाणें पुष्कळ काळपर्यंत मनांत असलेल्या पण आतांच प्रकट झालेल्या परमपुरुषार्थरूपी तुला प्रत्यक्ष अवलोकन करून आज आम्ही सुखी झालों आहों ॥ १३ ॥ हे अंतरात्म्या, आम्हीं सर्व लोकपाल ज्याकरितां तुझ्या चरणांजवळ प्राप्त झालों आहों, तें कार्य तूं कर. कारण अंततर्यामिरूपानें सर्वसाक्षी असलेल्यां तुला इतरांनीं समजविण्यास योग्य अशी बाहेरची वस्तु काय बरें आहे ? ॥ १४॥ हे ईश्वरा, मी, रुद्र, देवादिक व इतर दक्षप्रभृति प्रजापति हे सर्व, अग्नीपासून उत्पन्न झालेल्या ठिणग्यांप्रमाणें तुझ्यापासून निराळे भासमान होत असल्यामुळें आपल्या सुखाचें साधन जाणण्यास कसे समर्थ होऊं ? यास्तव तूंच ब्राह्मणांच्या व देवांच्या सुखाचा उपाय आम्हांला सांग ॥ १५ ॥

शुकाचार्य म्हणाले,–हे राजा, ह्याप्रमाणें ब्रह्मादिकांनीं स्तुति केली असता त्यांचा अभिप्राय काय आहे तो भगवंतानें लक्षांत आणला व सर्व इंद्रियांचें संयमन करून आपल्यापुढें हात जोडून उभा राहिलेल्या त्या देवांस त्यानें मेघासारख्या गंभीर वाणीनें उत्तर दिलें ॥ १६ ॥ हे राजा, देवाधिपति भगवान् तें देवकार्य करण्याविषयीं जरी एकटाच समर्थ होता, तथापि त्याला स्वत:लाहि समुद्रमंथनादि क्रीडा करण्याची इच्छा असल्यामुळें तो त्यांना म्हणाला ॥ १७ ॥

भगवान् म्हणाला,—हे ब्रह्मदेवा, हे शंभो, हे देव हो व हे गंधर्वादिक हो, तुम्ही सर्वजण एकाग्र अंत:करणपूर्वक माझें भाषण श्रवण करा म्हणजे तुमचें उत्तम प्रकारें कल्याण होईल ॥ १८ ॥ हे देव हो, तुम्ही आधीं दैत्यदानवांकडे जा आणि तुमचा स्वत:चा उत्कर्षकाळ येईपर्यंत, सध्यां काळानें ज्यांच्यावर अनुग्रह केला आहे, अशा त्या दैत्यदानवां-बरोबर सख्य करा ॥ १९ ॥ कारण, हे देव हो, एखादें मोठें कार्य करावयाचें असलें म्हणजे तें सिद्ध होण्याकरितां शत्रुबरोबरसुद्धां मैत्री केली पाहिजे; ती तुम्ही करा आणि तुमचा कार्यभाग झाला म्हणजे नंतर तुम्ही सर्पमूषकाप्रमाणें वध्यघातकभावानें वागा ॥२०॥ असो. सख्य केल्यानंतर ज्याचें प्राशन केलें असतां मृत्यूनें ग्रासलेलाहि प्राणी अमर होतो असें अमृत उत्पन्न करण्याकरितां तुम्ही त्यांच्यासह सत्वर यत्न करा ॥ २१ ॥ हे देव हो, प्रथम तुम्हीं क्षीरसागरामध्यें वेली, गवत, लता व औषधी ह्या घाला आणि मंदरपर्वताची रवि करून व वासुकीची रज्जु करून माझ्या साहाय्यानें तुम्ही आळस न करितां समुद्राचें मंथन करा. या कामीं दैत्य क्लेशमात्र भोगणारे होतील व तुम्हांलाच त्याचें फल मिळेल ॥ २२ ॥ २३ ॥ हे देव हो, हें कार्य होईपर्यंत असुर जें जें इच्छितील त्याला तुम्हीं अनुमोदन द्या. कारण साममार्गानें जशीं कार्यें सिद्ध होतात, तशीं क्रोधावेशानें होत नाहींत ॥ २४ ॥ समुद्रांतून उत्पन्न होणाऱ्या कालकूटविषाला तुम्ही मुळींच भिऊं नका व

मंथनापासून उत्पन्न होणाऱ्या वस्तूंविषयीं तुम्ही काम क्रोध अथवा लोभ कदापि धारण धारण करूं नका ।। २५ ।।

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें देवांना सांगून स्वेच्छानुसार वागणारा भगवान् त्यांच्या समक्ष गुप्त झाला ।। २६ ।। नंतर त्या भगवंताला नमस्कार करून ब्रह्मदेव व रुद्र हे उभयतां आपल्या स्थानीं निघून गेले आणि इतर सर्व देव बलीच्या दरवाज्यांत प्राप्त झाले ।। २७ ।। संधि आणि विग्रह यांना योग्य काल कोणता हे दैत्याधिपति बलि जाणत होता व म्हणूनच तो स्तुतीस पात्र होता; पण त्या देवरूपी शत्रूंना पाहून त्याचे सेनापति मात्र संतापून त्यांच्यावर धांवून गेले. तेव्हां बलीनें आपल्या सेनापतींचें निवारण केलें ।। २८ ।। नंतर ते देव, सर्वांना जिंकणारा, परमसंपत्तीनें युक्त व असुरसेनाधिपतींनीं सुरक्षित असा सिंहासनावर बसलेला जो विरोचनपुत्र बलिराजा, त्याच्याजवळ गेले आणि मधुर वाणीनें महाबुद्धिवान् इंद्रानें त्याचें सांत्वन करून, भगवान् पुरुषोत्तमानें अमृतासाठीं सांगितलेला समुद्राचें मंथन करण्याचा उपाय त्याला निवेदन केला ।। २९ ।। ३० ।। इंद्रांनीं सांगितलेली ही गोष्ट बलि, पौलोम, कालकेय, शंबरासुर, अरिष्टनेमि इत्यादि इत्यादि सर्व दैत्याधिपतींना तसेंच मयाच्या तीन नगरांत राहणारे असुर यांनाहि पसंत पडली ।। ३१ ।। मग हे शत्रुतापना राजा, देव व असुर यांनीं एकमेकांचें भाषण मान्य करून परस्परांशीं मैत्री केली व अमृतप्राप्तीकरितां मोठा उद्योग सुरू केला ।। ३२ ।। परिघासारख्या बाहूंनीं युक्त व सशक्त असल्यामुळें दुर्मद, अशा त्या देवदैत्यांनीं प्रथम मंदरपर्वताला बलात्कारानें उपटलें व गर्जना करीत ते त्याला समुद्राच्या कांठीं नेऊं लागले. तो नेत असतां इंद्रादि देव व बलिप्रभृति दैत्य हे सर्व दूरपर्यंत पर्वताचा भार वाहिल्यामुळें श्रम पावून जेरीस आले. त्याला आणखी पुढें नेण्यास ते असमर्थ झाले व त्यांनीं वाटेंतच त्याला टाकून दिलें ।। ३३ ।। ३४ ।। पण पडतां पडतां त्या सुवर्णाच्या पर्वतानें आपल्या विशाळ अंगाखालीं पुष्कळ देवदैत्यांचें चूर्ण करून टाकिलें ।। ३५ ।। अशा प्रकारें, ज्यांचे बाहु, मांड्या व माना भग्न झाल्या आहेत आणि ज्यांच्या मनाचा उत्साह नाहींसा झाला आहे, अशा त्या देवदैत्यांना पाहून भगवान् गरुडध्वज विष्णु त्या ठिकाणीं अकस्मात् प्रगट झाला ।। ३६ ।। आणि पर्वत अंगावर पडल्यामुळें जे चूर्ण झाले आहेत अशा त्या देवदानवांना अमृतदृष्टीनें पाहून त्यानें त्यांस सजीव करून पूर्वीप्रमाणें शक्तियुक्त व व्रणरहित केलें ।। ३७ ।। नंतर त्यानें एका हातानें तो पर्वत लीलेनें उचलून गरुडावर ठेविला आणि आपणहि त्याच्यावर आरूढ होऊन देवदैत्यांसह तो समुद्राच्या तीरावर येऊन पोंचला ।। ३८ ।। तेव्हां पक्षिश्रेष्ठ गरुडानें आपल्या खांद्यावरून तो पर्वत खालीं उतरून समुद्राच्या पाण्याजवळ ठेविला आणि श्रीहरीची जाण्याकरितां आज्ञा मिळाल्यावर तो तेथून निघून गेला ।। ३९ ।।

**सहावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, नंतर त्या देवदैत्यांनीं नागराज वासुकीला अमृतापैकीं कांहीं भाग देण्याचें वचन दिलें, व त्याच्या शरीराला दोरीप्रमाणें त्या मंदर-पर्वताच्या सभोंवतीं गुंडाळून अमृतप्राप्तीकरितां मोठ्या हर्षानें समुद्रमंथन करण्याचा उद्योग सुरू केला. त्या प्रसंगीं प्रथम विष्णूनें वासुकीला मुखाकडून धरिलें म्हणून देवांनींहि तसेंच केलें ॥ १॥ २॥ परंतु भगवंताचें हें करणें दैत्याधिपतींना आवडलें नाहीं. ते म्हणाले, आम्ही वेदशास्त्रसंपन्न असून जन्मकर्मांनीं श्रेष्ठतम आहोंत. आम्हीं सर्पाचें पुच्छरूप हें अमंगळ अंग धरणार नाहीं. असें म्हणून ते स्वस्थ बसले. तो प्रकार पाहातांच भगवान् पुरुषोत्तमानें हंसत हंसत वासुकीच्या तोंडांचा भाग सोडिला आणि देवांसह त्यानें शेपटीचा भाग हातीं धरिला. ह्याप्रमाणें दोरी धरण्याच्या कामाची वांटणी करून ते कश्यपपुत्र देव आणि दैत्य मोठ्या प्रयत्नानें अमृताकरितां क्षीरसमुद्राचें मंथन करूं लागले ॥ ३ ॥ ४ ॥ ॥ ५ ॥ हे पांडुनंदना, क्षीरसागराचें मंथन होऊं लागलें त्या वेळीं महाबलाढ्य देवदैत्यांनीं त्या पर्वताला सांवरून धरिलें असतांहि त्याच्या तळाशीं कांहीं आधार नसल्यामुळें तो उदकामध्यें बुडूं लागला. तेव्हां बलवत्तर दैवयोगानें केलेला समुद्रमंथनरूप आपला प्रयत्न व्यर्थ झाला असें जाणून ते देव व दैत्य मनामध्यें अगदीं खिन्न झाले व त्यांची मुखश्री म्लान होऊन गेली ॥६॥७॥ त्या वेळीं अनंतपराक्रमी व सत्यसंकल्प अशा त्या श्रीहरीनें, विघ्नराजानें केलेलें तें विघ्न पाहून, मोठें अद्भुत असें कूर्मरूप धारण केलें आणि पाण्यांत बुडत असलेला मंदरपर्वत वर काढिला ॥८॥ याप्रमाणें मंदरपर्वत पुन: वर आलेला पाहून देव व दैत्य पुन: समुद्राचें मंथन करण्यासाठीं उभे राहिले. त्या वेळीं दुसरें द्वीपच कीं काय, असें कांसवाचें मोठें शरीर भगवंतानें धारण करून, लक्ष योजनें विस्तीर्ण अशा आपल्या पृष्ठभागावर तो पर्वत सांवरून धरिला ॥ ९ ॥ हे राजा, तेव्हां देवदैत्यांच्या बाहुबलानें कांपूं लागलेला व वाटोळा फिरणारा तो पर्वत, पाठीवर धारण करणाऱ्या त्या अत्यंत बलवान् अशा कूर्मरूपी भगवंताला, त्या पर्वताच्या फिरण्यानें होणारें पाठीचें घर्षण, अंग खाजविण्या-प्रमाणेंच वाटलें ॥ १० ॥ ह्याप्रमाणें तो भगवान् विष्णु, मंथन चाललें असतां देवदैत्यांमध्यें शक्ति व उत्साह उत्पन्न करून त्यांना उत्तेजन देण्यासाठीं असुरांमध्यें असुररूपानें व देवांमध्यें देव पानें आणि नागराजामध्यें निद्रारूपानें प्रविष्ट झाला ॥ ११ ॥ नंतर भगवान् विष्णूनें जणूं दुसरा महापर्वतच अशा आपल्या हजार हातांनीं त्या पर्वतराजाचा माथा धरून ठेविला. तो प्रकार पाहून ब्रह्मदेव, शंकर, इंद्र इत्यादि देवांनीं त्याची स्तुति केली व स्वर्गांतून त्याच्यावर पुष्पवृष्टि केली ॥ १२ ॥ असो. याप्रमाणें त्या पर्वताच्या ऊर्ध्वभागीं तसेंच देवदैत्यांच्या शरिरांमध्यें पर्वतामध्यें, व वासुकीच्या शरिरांत प्रविष्ट झालेल्या परमात्म्याच्या योगानें बलवान् व मदोन्मत्त झालेले ते देवदैत्य समुद्राचें मोठ्या वेगानें

मंथन करूं लागले असतां त्यांतील सुसरींचे थवे घाबरून गेले ॥ १३ ॥ त्या वेळीं त्या सर्पराज वासुकीच्या अपरिमित व कठोर अशा नेत्र, मुख आणि श्वास यांपासून निघालेल्या अग्नीच्या व धुराच्या योगानें पौलोम, कालेय, बलि व इल्वल इत्यादि असुरांचें तेज नष्ट झालें व ते वणव्यानें दग्ध झालेल्या सुरूच्या वृक्षाप्रमाणें दिसूं लागले ॥ १४ ॥ देवांचीहि तीच अवस्था झाली. वासुकीच्या श्वासांच्या ज्वाळांनीं निस्तेज होऊन त्यांचीं वस्त्रें, माला, उत्कृष्ट कवचें व मुखें धूम्रवर्ण झालीं. तेव्हां भगवंताचे आज्ञाधारक मेघ त्यांच्यावर वृष्टि करूं लागले व समुद्राच्या लाटांवरून येणारे गार वारे वाहूं लागले ॥ १५ ॥ असो. ह्याप्रमाणें देवदैत्यांच्या अधिपतींनीं मंथन केलेल्या त्या समुद्रापासून जेव्हां अमृत उत्पन्न होईना, तेव्हां भगवान् विष्णु स्वत:च त्याचें मंथन करूं लागला ॥ १६ ॥ हे राजा, त्या वेळीं तो मेघासारखा श्यामवर्ण भगवान् पिंवळा पीतांबर नेसला होता त्याच्या कानांतील कुंडलें विद्युल्लतेप्रमाणें चमकत होतीं, त्याच्या मस्तकावरील दैदीप्यमान केस उडत होते, त्यानें वनमाला धारण केली होती व त्याचे नेत्र आरक्त झाले होते. अशा रीतीनें पाठीवर पर्वताला उचलून धरून जयशाली बाहूंनीं दोरी धरून तो भगवान्, पर्वतरूप रवीनें मंथन करूं लागला असतां, दुसरा पर्वतच कीं काय असा शोभूं लागला ॥ १७ ॥ याप्रमाणें तिमि, मत्स्य, गज, नक्र व तिमिंगिल ह्यांनीं भरलेल्या त्या समुद्रांतील पाणी मंथनामुळें खवळून गेलें व मकर, सर्प व कांसव हे त्यांतून वर येऊं लागले. तेव्हां सागरापासून प्रथमत: अत्यंत दु:सह असें हालाहलनामक विष उत्पन्न झालें. ॥ १८ ॥ भयंकर तीव्र आणि ज्याच्यापुढें कांहींच उपाय चालण्यासारखा नाहीं असें तें असह्य विष, सर्व दिशांनीं वर खालीं उसळूं लागलें असतां सर्व लोक व लोकपाल भयभीत झाले आणि दुसऱ्या कोणाच्यानेंहि आपलें रक्षण होत नाहीं असें पाहून, ते भगवान् सदाशिवाला शरण गेले ॥ १९ ॥ त्रैलोक्याच्या उत्कर्षाकरितां भवानीसह कैलासपर्वतावर बसलेला, मुनींना मान्य असून त्यांस मोक्ष प्राप्त व्हावा म्हणून तपश्चर्या करणारा, असा तो देवश्रेष्ठ महादेव त्यांच्या दृष्टीस पडला. त्या वेळीं ते सर्व त्याला नमस्कार करून त्याची स्तुति करूं लागले ॥२० ॥

प्रजापति म्हणाले,—हे देवाधिदेवा महादेवा, हे जगदात्म्या भूतपालका, त्रैलोक्याला जाळून टाकणाऱ्या ह्या विषापासून तूं आम्हां शरणागतांचें रक्षण कर ॥ २१ ॥ हे परमात्म्या, सर्व जगतांच्या बंधमोक्षांचा अधिपति एक तूंच आहेस; यास्तव शरणागतांचें दु:ख निवारण करणाऱ्या तुज जगद्गुरूचेंच विवेकी पुरुष पूजन करितात ॥ २२ ॥ हे विभो, सर्वव्यापका, ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय करण्याची जेव्हां तुला इच्छा होते, तेव्हां स्वत:सिद्ध ज्ञानवान् असा तूंच आपल्या गुणमय शक्तीच्या योगानें ब्रह्मा, विष्णु आणि शिव अशा संज्ञा धारण करितोस ॥ २३ ॥ कारण अत्यंत गुह्य जें ब्रह्म तें तूंच असून देव, मनुष्य, पशु इत्यादि प्राण्यांचा उत्पादकहि तूंच आहेस. आत्मा तूंच असून नाना प्रकारच्या शक्तींमुळें जगद्रूपानें भासणारा असल्यामुळें जगच्चालकहि तूंच आहेस ॥ २४ ॥ हे प्रभो, तूं वेदांचेंहि मूळ असल्यामुळें स्वत:सिद्ध ज्ञानवान् आहेस. तसाच तूं महतत्त्वरूपी असून, प्राण, इंद्रियें व पृथिव्यादि द्रव्यें ह्यांस कारणभूत अशा गुणांनीं युक्त असा त्रिविध अहंकार,

स्वभाव व संकल्पहि आहेस; कारण, त्रिगुणात्मक जी माया ती तुझ्याच आश्रयानें असते असें वेदवेत्ते म्हणतात ॥ २५ ॥ त्याप्रमाणेंच, हे विश्वोत्पादका, सर्व देवतास्वरूपी अग्नि हें तुझें मुख, भूमि हें तुझें चरणकमळ, काल हे सर्व देवतारूपी असलेल्या तुझें गमन, दिशा ह्या तुझे कर्ण व वरुण हा तुझे रसनेंद्रिय होय असें म्हणतात ॥ २६ ॥ तसेंच हे भगवन्, आकाश ही तुझी नाभि, वायु हा तुझा श्वास, सूर्य हा नेत्र, जल हें रेत, उत्कृष्ट-निकृष्ट जीवांचा आश्रय हा तुझा अहंकार, चंद्र हें मन आणि स्वर्ग हें तुझें शिर होय. ॥ २७ ॥ हे वेदत्रयरूप परमात्म्या, सप्त समुद्र तुझें उदर, पर्वत हे तुझे केश, गायत्र्यादिक छंद ह्या साक्षात् तुझ्या सप्त धातु होत आणि सर्व प्रकारचा धर्म हें तुझें हृदय होय ॥ २८ ॥ तसेंच, हे ईश्वरा, तत्पुरुष, अघोर, सद्योजात, वामदेव आणि ईशान हे उपनिषद्रूपी जे पांच मंत्र, ते तुझीं पांच मुखें होत. त्या पांच मंत्रांच्या योगानें पदच्छेदरूपानें अडतीस मंत्रांचा समुदाय होतो. हे देवा, जें शिवनामक स्वयंप्रकाश असें परमार्थतत्त्व ती तुझी उपराम पावलेली अवस्था होय ॥ २९ ॥ हे देवा, अधर्माच्या दंभलोभादि लहरी, त्या तुझी छाया होत. ज्यांच्या योगानें नाना प्रकारची सृष्टि होते असे सत्त्व, रज व तम हे गुण तुझे तीन नेत्र होत. गायत्र्यादि छंदोरूप जो सनातन वेद, तो सर्व शास्त्रप्रवर्तक अशा तुझें अवलोकन होय॥ ३० ॥ हे शंकरा, जेथें रज, तम व सत्त्व हे तिन्ही गुण मुळींच नाहींत, असें तुझें भेदशून्य व परंज्योतिरूप ब्रह्मस्वरूप आहे, तें सर्व लोकपाल, ब्रह्मा, विष्णु व देवेंद्र यांनाहि समजण्यास शक्य नाहीं ॥ ३१ ॥ हे शंकरा, मदन, दक्षाचा यज्ञ, त्रिपुर व कालकूट विष इत्यादि अनेक प्रकारच्या भूतद्रोह्यांचा नाश करणारा जो तूं त्या तुझ्या कर्मांच्या वर्णनानें तुझी स्तुति पुरी होणार नाहीं. कारण सृष्टीच्या संहारकालीं तूं स्वतः उत्पन्न केलेलें हें विश्व आपल्या नेत्रांतून उत्पन्न झालेल्या अग्निकणांच्या ज्वालेनें भस्मरूप झालें असतां, तें तुझ्या लक्षांतहि येत नाहीं असा तुझा पराक्रम अनंत आहे. ॥ ३२ ॥ हे ईश्वरा, जगाला हितोपदेश करणारे व स्वस्वरूपी रममाण होणारे पुरुष ज्या तुझ्या चरणांचें निरंतर हृदयामध्यें चिंतन करितात व जो तूं ऋषींच्या संप्रदायमार्गाच्या प्रवृत्तीसाठीं तप करीत आहेस आणि देवी पार्वतीसह प्रेमानें संचार करीत आहेस त्या तुला स्मशानामध्यें संचार करणारा, क्रूर व हिंसक असें मानून जे गडबड करितात, त्यांना खरोखर तुझी लीला कळते, असें कसें म्हणतां येईल ? ते निंदक केवळ निर्लज्ज होत. ॥ ३३ ॥ कार्यकारणाच्या पलीकडे असलेली जी माया तिच्याहूनहि पलीकडचा सर्वव्यापक जो तूं, त्या तुज परमेश्वराच्या स्वस्वरूपाचें साक्षात् ज्ञान करून घेण्यास ब्रह्मादिकहि समर्थ झाले नाहींत व त्यांना तुझें स्तवनहि करतां आलें नाहीं. अर्थात् ही जी आम्हीं तुझी स्तुति केली आहे, ती केवळ आमच्या अल्प शक्तीला अनुसरून आहे; ॥ ३४ ॥ हे परमेश्वरा, केवळ तुझें हें सगुण स्वरूपच आम्ही पाहात आहोंत; याहून दुसरें जें तुझें सर्व कारणभूत अतिसूक्ष्म निर्गुण स्वरूप तें आम्हांला दिसतच नाहीं. तथापि, तुझ्या दर्शनामुळेंच आज आम्हीं कृतार्थ झालों आहों. तुझें कर्महि अव्यक्त असून तूं जो हा सगुणरूपानें प्रगट झाला आहेस, तो केवळ

लोकांच्या सुखाकरितांच आहेस. यास्तव तूं ह्या विषाचा नाश करून आम्हांला सुखी कर ॥ ३५ ॥

शुकाचार्य म्हणाले. –हे राजा, याप्रमाणें सर्व लोकांवर आलेलें तें संकट पाहून भगवान् महादेवाला त्याचा अत्यंत कळवळा आला व सर्वभूतांचा हितचिंतक असा तो शंकर, पतिव्रता अशा प्रिय पार्वतीशीं बोलूं लागला ॥ ३६ ॥ शिव म्हणाला, हे भवानि, क्षीरसमुद्राच्या मंथनापासून उत्पन्न झालेल्या विषाच्या योगानें या लोकांवर केवढें संकट ओढवलें आहे तें पाहा ॥ ३७ ॥ प्राणरक्षणाची इच्छा करणाऱ्या ह्या प्रजाजनांना माझ्याकडून अभय मिळालेंच पाहिजे. कारण, दीनांचें परिपालन करणें हेंच प्रभूचें कर्तव्य होय ॥ ३८॥ म्हणूनच साधु लोक क्षणभंगुर असे आपले प्राण खर्चूनहि, प्राण्यांचें रक्षण करितात. हे भद्रे, परमात्म्या भगवंताच्या मायेनें मोहित होऊन एकमेकांशीं वैर धारण करून परस्परांचा घात करूं पाहाणाऱ्या प्राण्यांवर जो पुरुष कृपा करतो, त्यावर सर्वात्म हरि प्रसन्न होतो आणि भगवान् श्रीहरि प्रसन्न झाला असतां ह्या चराचर विश्वासह मीहि संतुष्ट होतों. यास्तव आतां मीं हें विष भक्षण करितों. माझ्या प्रजा सुखी होवोत. ॥ ३९ ॥४०॥

शुकाचार्य म्हणाले,– हे राजा, ह्याप्रमाणें भवानीला सांगून भगवान् विश्वपालक शंकर तें विष भक्षण करण्यास प्रवृत्त झाला आणि शंकराचा प्रभाव जाणून पार्वतीनेंहि त्या कृत्यास अनुमोदन दिलें ॥ ४१ ॥ नंतर सर्व जगाला व्यापणारें तें हालाहल विष, भूतपालक महादेवानें आपल्या ओंजळींत घेऊन लोकांवर दया करण्यासाठीं पिऊन टाकलें ॥ ४२ ॥ पण पाण्याचा दोषच अशा त्या विषानें महादेवालाहि आपलें चांगलेंच सामर्थ्य दाखविलें; व त्यामुळें शंकराचा गळा निळा झाला. आतां हा नीळवर्णहि त्या दयाळु महादेवाला भूषणच झाला ही गोष्ट वेगळी ! ॥ ४३ ॥ याप्रमाणें साधु लोक बहुतकरून लोकांच्या दुःखानेंच दुःखी होतात आणि त्याच्या निवृत्तीकरितां स्वतः दुःख भोगितात; कारण दुसऱ्याकरितां दुःख सहन करणें, हेंच सर्वांतल्या पुरुषोत्तमाचें सर्वोत्कृष्ट आराधन होय ॥ ४४ ॥ असो. भक्तांचे मनोरथ पुरविणाऱ्या देवाधिदेव शंकराचें तें कर्म अवलोकन करून, सर्व लोक, पार्वती, ब्रह्मदेव आणि विष्णु ह्या सर्वांनीं त्याची प्रशंसा केली ॥ ४५ ॥ हे राजा, तो महादेव विषप्राशन करीत असतां त्याच्या हातांतून जें थोडेंसें विष खालीं पडलें, तें विंचू, सर्प, विषारी औषधि व इतर दंश करणारे विषारी प्राणी यांनीं ग्रहण केलें ॥ ४६ ॥

## सातवा अध्याय समाप्त

# अध्याय ८ वा

शुकाचार्य म्हणाले, हे राजा, शंकरानें विष प्राशन केल्यानंतर संतुष्ट झालेले ते देवदानव पुन: मोठ्या वेगानें समुद्राचें मंथन करूं लागले. तेव्हां त्यापासून कामधेनु उत्पन्न झाली ॥ १ ॥ हे राजा, ती कामधेनु अग्निहोत्राला साधनभूत असे घृतादि पदार्थ उत्पन्न करणारी असल्यामुळें ब्रह्मलोकाला पोंचविणाऱ्या यज्ञाच्या होमद्रव्याकरितां, वेदवेत्त्या ऋषींनीं तिचा स्वीकार केला ॥ २ ॥ नंतर चंद्राप्रमाणें शुभ्रवर्ण असा उच्चै:श्रवानामक घोडा उत्पन्न झाला. दैत्यराज बलीनें तो आपल्याला पाहिजे अशी इच्छा दर्शविली आणि असुर जें म्हणतील त्याला तुम्ही अनुमोदन द्या, असा पूर्वीच श्रीविष्णूनें देवांना उपदेश केला असल्यामुळें इंद्रानें त्याची इच्छा केली नाहीं. ॥ ३ ॥ त्याच्या मागाहून आपल्या चार दंतांच्या योगानें भगवान् महादेवाच्या कैलासपर्वताची शोभा हरण करणारा व चंद्राप्रमाणें शुभ्र असा एक ऐरावतनामक हत्ती निघाला ॥ ४ ॥ त्यानंतर त्या महासागरांतून पद्मराग जातीचें कौस्तुभनामक एक रत्न उत्पन्न झालें. तो कौस्तुभमणि आपल्या वक्ष:स्थलावर भूषण म्हणून धारण करावा, अशी श्रीविष्णूनें इच्छा केली ॥ ५ ॥ तदनंतर देवलोकाचें भूषणच असा पारिजातकवृक्ष उत्पन्न झाला. हे राजा, भूतलावर तूं जसा सर्वदा याचकांचे मनोरथ पूर्ण करितोस, त्याप्रमाणें तो वृक्षहि इच्छित वस्तू देऊन, स्वर्गस्थ याचकांचे मनोरथ सर्वदा परिपूर्ण करीत असतो ॥ ६ ॥ पारिजातकामागून उत्तम वस्त्रें परिधान करणाऱ्या, कंठामध्यें पदकादिक भूषणें धारण करणाऱ्या आणि सुंदर गमन, मोहक क्रीडा व मधुर कटाक्ष ह्यांच्या योगानें स्वर्गांत राहणाऱ्या देवांना रमविणाऱ्या, अशा अप्सरा उत्पन्न झाल्या ॥ ७ ॥ नंतर सुदामानामक पर्वताच्या एका दिशेस उत्पन्न झालेल्या विद्युल्लतेप्रमाणें, आपल्या कांतीनें सर्व दिशा प्रकाशित करणारी साक्षात् संपत्तीच, अशी भगवंतावर निष्ठा ठेवणारी लक्ष्मी उत्पन्न झाली ॥ ८ ॥ तिचें सुंदर रूप, औदार्य, वय व कांति ह्यांच्या महिम्यानें मोहितचित्त झालेले सर्व देव, असुर व मनुष्य ती आपल्याला मिळावी, अशी इच्छा करूं लागले ॥ ९ ॥ हे राजा, त्या लक्ष्मीकरितां महेंद्रानें एक मोठें सुंदर आसन तयार केलें व मूर्तिमंत श्रेष्ठ नद्यांनीं सुवर्णकुंभांतून तिच्या अभिषेकाकरितां पवित्र उदक आणिलें ॥ १० ॥ त्याचप्रमाणें अभिषेकास लागणाऱ्या सर्व औषधी भूमीनें अर्पण केल्या, गाईंनीं दूध, दहीं इत्यादि पांच द्रव्यें दिलीं आणि वसंतऋतूनें आपल्या चैत्रवैशाखमासांमध्यें होणारी फलपुष्पादिक संपत्ति तिला अर्पण केली ॥ ११ ॥ नंतर ऋषींनीं शास्त्रोक्तप्रकारानें तिला अभिषेक करण्यास आरंभ केला असतां, गंधर्व मंगलकारक गीतें गाऊं लागले आणि नटस्त्रिया नृत्य व गायन करूं लागल्या ॥ १२ ॥ मेघहि त्या वेळीं मंदमंद गर्जना करूं लागले. गंभीर शब्द करणारीं, मृदंग, पणव, मुरज, आनक व गोमुख इत्यादि वाद्यें लोक

वाजवूं लागले. तसेंच शंख, वेणु व वीणा यांचाहि नाद होऊं लागला ॥ १३ ॥ नंतर हातांमध्यें कमळ धारण केलेल्या त्या पतिव्रता लक्ष्मीदेवीला, ब्राह्मणांनीं पठण केलेल्या सूक्तांच्या घोषांत जलपूर्ण घटाच्या योगानें दिग्गजांनीं अभिषेक केला ॥ १४ ॥ मग सागरानें त्या लक्ष्मीदेवीला नेसावयास व अंगावर घ्यावयास दोन किरमिजी वर्णाचीं रेशमाचीं वस्त्रें अर्पण केलीं; मध शोषण करून मत्त झालेले भ्रमर जिच्यावर गुंजारव करीत आहेत अशी वैजयंती माळा वरुणानें दिली. विश्वकर्म्या प्रजापतीनें नाना रंगांचीं रत्नजडित भूषणें दिलीं. सरस्वतीनें हार अर्पण केला. ब्रह्मदेवानें कमळ दिलें व नागांनीं तिला दोन कुंडलें दिलीं ॥ १५ ॥ १६ ॥

याप्रमाणें अहेर होऊन स्वस्तिवाचनादि विधि पूर्ण झाल्यावर, जिच्या सुंदर गालांवर कुंडलांची कांति झळकत आहे, जिचें मुखकमल सलज्ज हास्यानें सुशोभित आहे, जिच्या सभोंवार भ्रमर गुंजारव करीत आहेत अशी ती लक्ष्मी कमलमाला हातांत धरून आपणास योग्य वर पाहण्याकरितां इकडेतिकडे फिरूं लागली ॥ १७ ॥ तिचें उदर अति कृश होतें. तिच्या दोन्ही स्तनांवर चंदन व केशर ह्यांचा लेप केला होता व ते दोन्ही एकमेकांना अगदीं चिकटून होते. ती इकडूनतिकडे चालत असतां तिच्या पायांतील नूपुरांचा मनोहर शब्द होत होता व ती सुवर्णलतेप्रमाणें तळपत होती ॥ १८ ॥ हे राजा, ती लक्ष्मी गंधर्व, यक्ष, असुर, सिद्ध, चारण व स्वर्गांत राहणारे देव ह्यांमधून निर्दोष, शाश्वत व निरंतर सद्गुणांनीं युक्त असा पतिरूप आश्रय आपल्याला कोणी मिळतो काय, म्हणून शोध करीत होती; परंतु कोठें कांहीं, तर कोठें कांहीं असे दोष असल्यामुळें तिला मनासारखा पति त्यांत मिळेना ॥ १९ ॥ दुर्वासासारख्यांमध्यें तप होतें, परंतु त्यांनीं क्रोध जिंकलेला नव्हता. गुरुशुक्रादिक कोणी ज्ञानी होते; परंतु ते वैराग्यशाली नव्हते. ब्रह्मदेव, चंद्र इत्यादि कोणी महात्मे होते; परंतु त्यांनीं कामाचा जय केलेला नव्हता. इंद्रादिक दुसरे जे होते ते दुसऱ्याच्या आश्रयाची अपेक्षा धरणारे असल्यामुळें त्यांच्यामध्यें ईश्वरत्व नव्हतें ॥ २० ॥ परशुरामासारखा कोणी धर्मनिष्ठ होता; परंतु त्याच्या ठिकाणीं भूतदया नव्हती. कोठें शिबिराजासारख्यामध्यें दानशक्ति होती; परंतु केवळ दान, मुक्तीला पुरेंसें कारण होत नाहीं. कार्तवीर्यासारख्या पुरुषांच्या ठिकाणीं बल होतें; परंतु ते कालवेगाच्या तडाक्यांतून सुटलेले नव्हते. सनकादिक मुनि निःसंग होते; परंतु ते निरंतर समाधिनिष्ठ असल्यामुळें त्यांना वरण्याचा प्रश्नच नव्हता ॥ २१ ॥ कोणी मार्कंडेयासारखे दीर्घ आयुष्यमान् होते; परंतु स्त्रियांना सुखकारक असा त्यांचा स्वभाव नव्हता. हिरण्यकशिपूसारख्या कांहीं पुरुषांमध्यें स्त्रियांना सुखदायक असा स्वभावहि होता; परंतु त्यांच्या आयुष्याची स्थिरता निश्चयानें समजण्यासारखी नव्हती. श्रीशंकरासारखे कोणी स्त्रियांना सुखकारक स्वभाव व आयुष्याचा निश्चय या दोन्ही गोष्टींनीं युक्त होते; परंतु ते अमंगल होते. शेवटीं जो पुरुष अत्यंत मंगलकारक व आचरणानें युक्त असून अगदीं निर्दोष आहे, जो आपली इच्छा करीत नाहीं, जो मायागुणतीत असून निरंतरच्या धर्मज्ञानादि सद्गुणांनीं मंडित असल्यामुळें सर्वश्रेष्ठ

आहे; जो स्वत:च्या आश्रयावरच अवलंबून असून दुसऱ्या कशाचीहि अपेक्षा न करणारा व अणिमादि सर्व गुणांनीं वरिलेला असा आहे; अशा प्रकारें एकंदर विचार करून आपल्याला इष्ट अशा मुकुंदाला तिनें पति म्हणून पसंत केलें ।। २२ ।। २३ ।। मग मदोन्मत्त अशा भ्रमरांच्या गुंजारवानें निनादित झालेली अशी रमणीय नूतन कमळांची ती माळ तिनें मुकुंदाच्या गळ्यांत घातली आणि लज्जायुक्त हास्यानें विकसित झालेले नेत्र, लवकरच आपलें निवासस्थान होणाऱ्या अशा त्याच्या वक्ष:स्थलाकडे लावून ती उभी राहिली ।। २४ ।। तेव्हां हे राजा, संपूर्ण वैभवांनीं युक्त अशा त्या त्रिभुवनजनक श्रीविष्णूनेंहि आपलें वक्ष:स्थळ त्या त्रैलोक्यजननी लक्ष्मीचें सर्वश्रेष्ठ असें निवासस्थान केलें. त्या वेळीं लक्ष्मीनें तेथें स्थिर होऊन आपल्या दयापूर्ण दृष्टीनें लोकपालांसह त्रैलोक्यांतील सर्व प्रजाजनांकडे पाहून त्यांचा गौरव केला ।। २५ ।। त्या वेळीं शंख, तूर्य व मृदंग ह्या वाद्यांचा व स्त्रियांसह नृत्यगायन करणाऱ्या देवानुयायी गंधर्वादिकांचा मोठाच ध्वनि उत्पन्न झाला ।। २६ ।। ब्रह्मदेव, रुद्र, अंगिरा इत्यादि सर्व प्रजापतींनीं त्या लक्ष्मीनारायणांवर पुष्पवृष्टि करीत विष्णुप्रतिपादक व अर्थपूर्ण अशा वैदिक मंत्रांनीं, भगवान् प्रभूची स्तुति केली ।। २७ ।। त्या वेळीं लक्ष्मीनें प्रजाधिपतींसह सर्व प्रजांकडे अवलोकन केलें असतां त्या सुस्वभावादिगुणांनीं संपन्न होऊन अतिशय आनंद पावल्या ।। २८ ।। हे राजा, याप्रमाणें लक्ष्मीनें श्रीविष्णूला वरून इतर देवदानवांना झिटकारिलें असतां, ते धैर्यहीन, आशाळभूत, निरुद्योगी व निर्लज्ज होऊन बसले ।। २९ ।। असो. नंतर त्या क्षीरसमुद्रापासून, जिचे नेत्र कमलाप्रमाणें आहेत अशी सुरादेवी कन्यारूपानें उत्पन्न झाली आणि श्रीहरीच्या अनुमतानें असुरांनीं तिचा स्वीकार केला ।। ३० ।। हे राजा, याप्रमाणे अमृतप्राप्तीकरितां देवदैत्य क्षीरसागराचें मंथन करीत असतां, शेवटीं त्यांतून अत्यंत अद्भुत असा एक पुरुष निघाला ।। ३१ ।। त्याचे बाहु लांब व पुष्ट होते. त्याचा कंठ शंखासारखा तीन रेषांनीं युक्त असून नेत्र आरक्त होते. त्याचा वर्ण मेघासारखा सावळा होता. तो वयानें तरुण असून त्यानें गळ्यांत पुष्पमाला घातली होती व तो सर्व भूषणांनीं मंडित झाला होता ।। ३२ ।। त्यानें पिवळें वस्त्र परिधान केलें होतें. त्याचें वक्ष:स्थळ विशाळ असून त्याच्या कर्णांतील रत्नांचीं कुंडलें फारच तेजस्वी होतीं. त्याच्या केसांचीं अग्रें तुळतुळीत व कुरळ असून, तो दिसण्यामध्यें सुंदर होता व त्याचा पराक्रम सिंहासारखा होता ।। ३३ ।। त्यानें हातांमध्यें अमृतानें भरलेला कलश धारण केला असून त्याचे हात कडींतोड्यांनीं अलंकृत होते व तो प्रत्यक्ष साक्षात् भगवान् विष्णूच्या अंशापासून उत्पन्न झालेला होता ।। ३४ ।। तो धन्वंतरी या नांवानें प्रसिद्ध असून, वैद्यशास्त्राचा प्रवर्तक व यज्ञामध्यें हविर्भाग ग्रहण करणारा होता. असो. त्यानें हातांत धारण केलेला अमृतानें भरलेला कलश पाहून कामधेनुप्रभृति सर्व वस्तु आपणास प्राप्त व्हाव्या अशी इच्छा करणाऱ्या त्या सर्व असुरांनीं, वेगानें तो कलश त्याच्यापासून हिसकावून घेतला ।। ३५ ।। तो अमृतकलश असुर घेऊन चालले असतां देव मनांमध्यें खिन्न होऊन श्रीहरीला शरण

गेले ॥ ३६ ॥ तेव्हां त्यांचें तें दैन्य अवलोकन करून, आपल्या भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा भगवान् त्यांना म्हणाला, ' देव हो, तुम्ही खेद करूं नका, मी आपल्या मायेच्या योगानें त्यांच्यामध्यें परस्परांत कलह उत्पन्न करून तुमचें कार्य साधीन ! ' ॥ ३७ ॥ हे राजा, अमृताकरितां असुरांचीं मनें अगदीं आतुर झालीं होतीं. तेव्हां ' मी आधीं पिणार, तूं पिऊं नको, मी आधीं पिणार तूं पिऊं नको ' असें म्हणत ते परस्परांशीं कलह करूं लागले ॥ ३८ ॥ हे राजा, त्यांपैकीं कित्येक दैत्य दुर्बळ होते. प्रबळ दैत्यांनीं अमृतकलश हिसकून घेतलेला पाहून त्यांच्याविषयीं त्या दुर्बळांना मत्सर वाटूं लागला. ते त्यांचा तीव्र निषेध करून म्हणाले, देव व दैत्य यांनीं अमृत उत्पन्न करण्यासाठीं सारखेच श्रम केले आहेत. तेव्हां देवांनाहि त्याचा वांटा यज्ञांतील हविर्भागाप्रमाणें मिळणें योग्य आहे व हाच सनातन धर्म होय ॥ ३९ ॥ ४० ॥ ह्याप्रमाणें त्या दैत्यांमध्यें कलह सुरू झाला असतां, नाना उपाय जाणणाऱ्या सर्वसमर्थ विष्णूनें, अत्यंत अद्भुत व अवर्णनीय सुंदर असें स्त्रीरूप धारण केलें ॥ ४१ ॥ तिचें स्वरूप अत्यंत दर्शनीय असून, तिचा वर्ण निळ्या कमळाप्रमाणें श्याम होता. तिचे सर्व अवयव सुंदर असून तिनें दोन्ही कानांत सारखींच भूषणें घातलीं होतीं. तिचे गाल तेजस्वी व नाक उत्कृष्ट असल्यामुळें तिचें मुख फार रमणीय दिसत होतें ॥ ४२ ॥ नूतन यौवनानें वर्तुळाकार झालेल्या स्तनांच्या भारानें तिचें उदर कृश झालें होतें. तिचे नेत्र, मुखकमलाच्या सुगंधावर आसक्त होऊन गुंजारव करीत त्यावर झेंपा घालणाऱ्या भ्रमरांमुळें घाबरून गेल्यासारखे दिसत होते ॥ ४३ ॥ तिनें आपल्या वेणींत मोगऱ्यांच्या फुललेल्या फुलांची माळ घातली होती व गळ्यांतहि विविध अलंकार घालून तो सुशोभित केला होता ॥ ४४ ॥ तिनें आपल्या सुंदर दंडांवर बाजूबंद घातले होते. आणि निर्मळ वस्त्र नेसून त्यावर शोभिवंत कमरपट्टा चढविला होता. तिच्या पायांत तोरड्या असून ती चालूं लागली म्हणजे त्यांचा मधुर ध्वनि होत होता ॥ ४५ ॥ ती आपले सलज्ज व हास्ययुक्त कटाक्ष फेंकून, मधूनमधून भुंवया चाळवीत होती. अशा प्रकारें त्या दैत्यसेनाधिपतीच्या अंतःकरणामध्यें अपरिमित काम उद्दीपित करणारें स्त्रीरूप भगवंतानें धारण केलें ॥ ४६ ॥

**आठवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ९ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, नंतर ते असुर, अमृताकरितां स्नेहांचा त्याग करून परस्परांची निंदा करीत चोराप्रमाणें एकमेकांपासून अमृतपात्र हरण करीत असतां, त्यांच्याकडे येत असलेली ती स्त्री त्यांच्या दृष्टीस पडली ॥ १ ॥ तिला पाहून कामवासना उत्पन्न झालेले असुर ' काय हो हिचें सौंदर्य ! काय हो हिची कांति ! काय हो हिचें नव-तारुण्य !, असें म्हणूं लागले ॥२॥ ते म्हणाले,—हे कमलपत्राक्षि, हे सुंदरि, आमचीं मनें चलबिचल करणारी अशी तूं कोणाची कोण आहेस ? तूं कोठून आली आहेस ? व येथें येऊन तूं काय करावयाची इच्छा करीत आहेस ? ॥ ३ ॥ हे सुंदरी, देव, दैत्य, सिद्ध, गंधर्व, चारण व लोकाधिपति ह्यांपैकीं कोणीहि तुला आजपर्यंत स्पर्श केला नाहीं असें दिसतें. मग मनुष्यांचा स्पर्श तुला कोठून होणार ? ॥ ४ ॥ हे सुंदरी, देहधारी प्राण्यांचीं सर्व इंद्रियें व मन यांची तृप्ति करण्याकरितां परम दयाळु ईश्वरानेंच खरोखर तुला पाठविलें आहे काय ? ॥ ५ ॥ तसें असेल तर हे सुंदरी, हे मानिनि, एकाच वस्तूविषयीं चढाओढ करणाऱ्या व एकमेकांचे वैरी झालेल्या, आम्हां ज्ञातिबांधवांचें कल्याण कर ! ॥ ६ ॥ हे सुंदरी, आम्ही सर्व कश्यपाचे पुत्र असून परस्परांचे भाऊ आहो, व अमृतप्राप्तीकरितां आम्हीं सर्वांनीं मिळून मोठा प्रयत्न केला आहे. यास्तव आम्हां परस्परांमध्यें जेणेंकरून लढा न होईल, अशा योग्य रितीनें तूं आम्हांमध्यें या अमृताची वांटणी करून दे ! ॥७॥ याप्रमाणें दैत्यांनीं प्रार्थना केली असतां, मायेनें स्त्रीरूप धारण केलेला तो श्रीहरि, किंचित् हास्य करून मनोहर नेत्रकटाक्षांनीं त्यांच्याकडे पाहात पाहात त्यांना उत्तर देऊं लागला ॥ ८ ॥

श्रीभगवान् म्हणाला,— हे कश्यपपुत्र हो, मजसारख्या व्यभिचारिणी स्त्रीवर तुम्ही आसक्त कसे झाला ? कारण, जो ज्ञानी आहे असा पुरुष स्त्रियांवर कधींहि विश्वास ठेवीत नाहीं ॥ ९ ॥ हे दैत्य हो, नित्य नव्या नव्या वस्तूंचा शोध करीत असणाऱ्या अशा कोल्ह्यां-लांडग्याप्रमाणेंच व्यभिचारिणी स्त्रियांचेंहि सख्य टिकाऊ नसतें, असें ज्ञाते पुरुष म्हणतात ॥ १० ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें तिच्या थट्टेच्या शब्दांनीं ज्यांच्या मनाला विश्वास वाटला आहे, अशा त्या असुरांनीं कांहींएक विशेष अभिप्रायानें गंभीर असें हास्य करून, आपल्याजवळचें अमृतपात्र तिच्या हातांत दिलें ॥ ११ ॥ तेव्हां तें अमृतपात्र घेऊन किंचित् हास्ययुक्त व गोड शब्दांनीं स्त्रीरूपधारी श्रीहरि त्यांना म्हणाला,—हे दैत्य हो, मी केलेली गोष्ट चांगली असो किंवा वाईट असो, जर तुम्ही ती मानणार असाल, तर मी त्या अमृताची वांटणी करूण देतें ' ॥ १२ ॥ हें तिचें भाषण ऐकून तिच्या मनाचा थांग न लागलेल्या असुरांनीं ' ठीक आहे ' असें म्हणून तिला तें अमृत वांटण्याविषयीं अनु-

मोदन दिलें ॥ १३ ॥ नंतर उपोषणपूर्वक स्नान करून अग्नीमध्यें हविर्द्रव्यांचा होम करून, त्यांनीं गाई, ब्राह्मण व इतर प्राणी ह्यांना यथायोग्य कोमल तृणादिकांचें दान केलें. तसेंच ब्राह्मणांकडून पुण्याहवाचन करवून आपल्या मनाप्रमाणें नवीं नवीं वस्त्रें परिधान केलीं व भूषणें धारण करून ते सर्वहि देवदैत्य पूर्वेकडे अग्रें केलेल्या दर्भावर बसले ॥ १४॥ ॥१५ ॥ हे राजा, फुलें व दिवे ह्यांनीं युक्त व धूपांनीं सुवासित केलेल्या अशा त्या मंडपामध्यें देव आणि दैत्य पूर्वेस तोंड करून बसले असतां, ती मोहिनी स्त्री हातामध्यें अमृताचा कलश घेऊन सभेमध्यें प्रविष्ट झाली. तिच्या मांड्या हत्तीच्या सोंडेप्रमाणें होत्या. ती सुंदर पाटाव नेसलेली असून स्थूल नितंबभाराच्या योगानें तिचें चालणें मंदमंद होतें. तिच्या पायांत सुवर्णाच्या तोड्या रुणझुणत होत्या. तिचे नेत्र मद्याच्या योगानें चंचळ झाले होते आणि तिचे स्तन घटाप्रमाणें वर्तुळ व पुष्ट होते ॥१६॥१७॥ तिनें सुवर्णाचीं कुंडलें कानांत घातलीं होतीं, त्यायोगें तिचे कर्ण,नाक,गाल व मुख यांस विशेष शोभा आली होती व तिच्या वस्त्राचा पदर स्तनांवरून किंचित् सरल्यासारख्या झाला होता. अशा प्रकारें त्या परदेवतानामक लक्ष्मीच्या सखीला पाहून, तिच्या मंद हास्ययुक्त कटाक्षामुळें ते देव व दैत्य अगदीं मोहित झाले ॥ १८ ॥ असो. हे राजा, स्वभावतःच क्रूर असलेल्या असुरांना अमृत देणें हें सर्पांना दूध पाजण्यासारखें अन्यायाचें आहे, असें जाणून अच्युतानें त्यांना तें अमृत दिलें नाहीं ॥१९॥ त्या जगत्पति श्रीहरीनें त्या उभयतांच्या वेगवेगळ्या पंक्ति करून त्यांना आपापल्या पंक्तींत बसविलें ॥ २० ॥ नंतर हातामध्यें अमृताचा कलश घेऊन विष्णूनें बहुमानपुरःसर नेत्रकटाक्ष, हास्य, लज्जा व प्रियभाषणादिकांच्या योगानें दैत्यांना मोहित करून, दूर बसलेल्या देवांना तें जरा व मृत्यु यांचा नाश करणारें अमृत पाजिलें ॥ २१ ॥ हे राजा, त्या वेळीं आपण केलेल्या नियमांचें पालन करणारे ते असुर, त्या सुंदर स्त्रीच्या प्रेमकटाक्षानें मोहित झाले असल्यामुळें, तिच्याबरोबर वादविवाद करणें अयोग्य होय, असें जाणून निवांत बसले. ज्या स्त्रीनें आपणावर अत्यंत प्रेम केलें आहे, त्या प्रेमांत व्यत्यय येईल या भीतीनें त्यांनीं कांहींच अप्रिय भाषण केलें नाहीं ॥ २२ ॥ २३ ॥ ह्या प्रसंगीं देववेषानें आपलें रूप आच्छादित करून राहु देवांच्या पंक्तींत सूर्यचंद्रांच्यामध्यें बसला होता. त्यानेंहि अमृत प्राशन केलें. इतक्यांत चंद्रसूर्यांनीं हा दैत्य आहे असें श्रीविष्णूला सुचविलें ॥ २४ ॥ त्याबरोबर वस्तऱ्यासारख्या तीक्ष्ण धारेच्या आपल्या सुदर्शनचक्रानें श्रीहरीनें त्या अमृतपान करणाऱ्या राहूचें मस्तक तोडिलें. तेव्हां अमृताचा स्पर्श न झालेलें त्याचें धड गतप्राण होऊन भूमीवर पडलें ॥२५॥ परंतु त्याचें मस्तक अमृताचा स्पर्श झाल्यामुळें अमर झालें; म्हणून त्याला भगवंतानें सूर्यादिकांसारख्या ग्रहत्वाचा अधिकार दिला. चंद्रसूर्यांनीं आपली चहाडी केल्यामुळें त्यांच्याबरोबर वैरभाव धरून राहू अजूनहि पर्वणीच्या दिवशीं सूर्य चंद्रांच्या अंगावर धांवून जात असतो ॥ २६ ॥ असो. देवांनीं बहुतेक अमृत प्राशन केल्यानंतर, लोकपालक भगवान् श्रीहरीनें दैत्याधिपतीच्या समक्ष आपलें खरें स्वरूप प्रकट केलें ॥ २७ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें, देश, काल, हेतु,अर्थ, प्रयत्न व बुद्धि हें सर्व देवगणांचें व दैत्यगणांचें एकसारखें होतें; तथापि त्यांना फलप्राप्ति मात्र वेगवेगळी झाली. श्रीविष्णूच्या चरण-

कमलाच्या रजःकणांचा आश्रय केल्यामुळें दैत्यांना, देवगणांना अनायासानें अमृतरूप फल प्राप्त झालें व त्याच्यापासून विमुख असल्यामुळें दैत्यांना तें झालें नाही ॥ २८॥ प्राण, द्रव्य, कर्म, वाणी व मन ह्यांच्या योगानें देह व पुत्र इत्यादिकांकरितां लोक जें कर्म, करितात तें भेदबुद्धीनें केलेलें असल्यास व्यर्थ होतें; पण त्याच प्राणादिकांच्या योगानें ऐक्यबुद्धीनें जें कर्म करावें, तें वृक्षांच्या मुळांशीं पाणी घातलें असतां जसें खांद्यांना पोंचून त्यांची पुष्टि करितें, त्याप्रमाणें सर्वांना पोंचून महाफलदायक होतें ॥ २९ ॥

**अध्याय नववा समाप्त**

---

# अध्याय १० वा

शुकाचार्य म्हणाले,–हे राजा, याप्रमाणें मनोनिग्रहपूर्वक समुद्रमंथनाचा प्रयत्न करीत असतांहि त्या दानवदैत्यांना अमृत प्राप्त झालें नाहीं; कारण ते वासुदेवाविषयीं पराङ्मुख होते ॥ १ ॥ हे राजा, अशा प्रकारें अमृत प्राप्त करून ते आपले भक्त जे देव त्यांना वांटून दिल्यावर सर्व प्राणिमात्र पाहत असतां भगवान् विष्णु गरुडावर बसून तेथून निघून गेला ॥ २ ॥ असो. नंतर आपल्या शत्रूंचा झालेला उत्कर्ष दैत्यांना सहन न झाल्यामुळें ते आपलीं आयुधें सज्ज करून युद्ध करण्याकरितां देवांवर धावले ॥ ३ ॥ नारायणाच्या चरणांचा आश्रय केल्यामुळें देवांना अमृतप्राशन करावयास मिळालें होतें व त्यामुळेंच ते बलाढ्य झाले होते. अर्थात् देवही शस्त्रें घेऊन दैत्यांबरोबर त्यांच्याशीं युद्ध करूं लागले ॥ ४ ॥ हे राजा, त्या वेळीं क्षीरसमुद्राच्या तीरावर अंगावर रोमांच उठविणारें असें देवासुर नांवाचें महाभयंकर युद्ध झालें ॥ ५ ॥ या युद्धामध्यें ज्यांचें चित्त खवळून गेलें आहे असे ते देवदैत्यरूपी शत्रु, बल व ऐश्वर्य इत्यादिकांनीं सारखे असल्यामुळें एकमेकांवर तुटून पडले व बाण, नाना प्रकारचीं आयुधें ह्यांनीं परस्परांवर प्रहार करूं लागले ॥ ६ ॥ त्या वेळीं शंख, डंका, मृदंग, भेरी व डमरु ह्या वाद्यांबरोबरच गर्जना करणारे हत्ती, घोडे, रथ, शिपाई ह्यांचा एकच गोंगाट झाला ॥ ७ ॥ त्या युद्धामध्यें रथ्यांबरोबर रथी, पायदळाबरोबर पायदळ, घोडेस्वारांबरोबर, घोडेस्वार हत्तीस्वारांबरोबर हत्तीस्वार युद्ध करूं लागले.॥८॥हे राजा,कांहीं योद्धे उंटांवर,कांहीं हत्तींवर, कांहीं गाढवांवर; कांहीं गौरवर्ण हरिणांवर, कांहीं अस्वलांवर, कांहीं वाघांवर, कांहीं सिंहावर, कांहीं गिधाडांवर, कांहीं कंकपक्ष्यांवर, कांहीं बगळ्यांवर, कांहीं ससाण्यांवर, कांहीं भासपक्ष्यांवर, कांहीं तिमिंगिलनामक मत्स्यांवर, कांहीं शरभांवर, कांहीं टोणग्यांवर, कांहीं गेंड्यावर, कांहीं बैलांवर, कांहीं गव्यांवर, कांहीं अरुण नांवाच्या पशूंवर, कांहीं कोल्ह्यांवर, कांहीं उंदरांवर, कांहीं सरड्यांवर, कांहीं सशांवर, कांहीं मनुष्यांवर, कांहीं बोकडांवर, कांहीं काळवीटांवर, कांहीं हंसांवर, कांही डुकरांवर, कांहीं जलचर व स्थलचर अशा पक्ष्यांवर आणि कांहीं अक्राळविक्राळ देह धारण करणाऱ्या प्राण्यांवर आरूढ होऊन दोहों सैन्यांमध्यें एकापुढें एक घुसूं लागले ॥९॥ १०॥ ११॥ १२॥ हे परीक्षित्‌राजा, नाना प्रकारच्या रंगांच्या ध्वजपताका, शुभ्र व निर्मळ अशीं छत्रें, रत्नजडित दांड्यांनीं युक्त असे अत्यंत मूल्यवान् पंखे, मोरचेलें व चवऱ्या, वायूनें उडणारीं अंगांवरील वस्त्रें व मंदिलांचे पदर, दैदीप्यमान अशीं कवचें व अलंकार आणि सूर्याच्या किरणांमध्यें चमकणारीं उज्ज्वल शस्त्रें यांच्यायोगानें शोभणाऱ्या वीरांच्या रांगा तेथें उभ्या राहिल्यामुळें त्या देवदैत्यांचीं दोन्ही सैन्यें, जलचर प्राण्यांच्या थव्यांमुळें जणुं काय दोन समुद्रच अशीं शोभूं लागलीं ॥ १३ ॥ १४ ॥ १५ ॥ हे राजा, त्या युद्धामध्यें सर्व सेनापतींनीं वेष्टिलेला असा तो

दैत्याधिपति विरोचनपुत्र बलिराजा सर्व युद्धोपयोगी साधनांनीं युक्त, सर्व आश्चर्यांनीं भरलेल्या अशा विमानांत बसला होता. तें विमान अदृश्य होणारें व क्षणांत दृश्य होणारें असून त्याची गति न समजणारें असें अक्षम्य कल्पनेचें होतें. तें मयासुरानें निर्माण केलेलें असून कोणत्याहि इष्ट प्रदेशांत गमन करणारें होतें व त्याचें नांव ' वैहायस ' असें होतें. त्या श्रेष्ठ विमानांत बलिराजा आरूढ झाला असतां, चवऱ्या व उत्कृष्ट छत्रें यांच्या योगानें उदयकालीं शोभणाऱ्या चंद्राप्रमाणें शोभत होता ॥ १६ ॥ १७ ॥ १८ ॥ त्याच्या सभोंवतीं आपापल्या वाहनांवर आरूढ झालेले असुरसेनापति उभे होते. नमुचि, शंबर, बाण, विप्रचिति, अयोमुख, द्विमूर्धा, कालनाभ, प्रहेति, हेति, इल्वल, शकुनि, भूतसंताप, वज्रदंष्ट्र, विरोचन, हयग्रीव, शंकुशिरा,कपिल, मेघदुंदुभि, तारक, चक्रदृक, शुंभ,निशुंभ, जंभ, उत्कल, अरिष्ट, अरिष्टनेमि, त्रिपुराधिपति, मयासुर,हे व पौलम,कालेय आणि निवातकवच इत्यादि बहुतेक असुरसेनापति त्या स्थलीं होते ॥ १९ ॥ २० ॥ २१ ॥ २२ ॥ ते सर्वजण अमृताचा वांटा न मिळाल्यामुळें केवळ क्लेशांचे मात्र वांटेकरी झाले होते. त्यांनीं पूर्वीं रणभूमीवर पुष्कळ वेळां देवांना पराजित केलें असल्यामुळें या वेळींहि ते सिंहासारखे गर्जना करीत मोठा नाद करणारे शंख वाजवूं लागले. त्या वेळीं आपले शत्रु उन्मत्त झाले आहेत असें पाहून इन्द्र अत्यंत क्रुद्ध झाला आणि ऐरावतनामक दिग्गजावर आरूढ झाला. त्या प्रसंगीं ज्याच्यावरून उदकप्रवाह वाहत आहेत अशा उदयाचलावर आरूढ झालेल्या सूर्याप्रमाणें तो शोभूं लागला ॥ २३ ॥ २४॥ २५ ॥ तेव्हां नाना प्रकारचीं वाहनें, ध्वज आणि आयुधें ह्यांनीं युक्त असलेले देव, आपल्या गणांसह युद्धास तत्पर झालेले वायु, अग्नि, वरुण इत्यादि लोकपाल, त्या इन्द्राच्या सभोंवार उभे राहिले ॥ २६ ॥ नंतर ते देव व दैत्य एकमेकांच्या समोर जाऊन मर्मभेदक भाषणांनीं परस्परांचा तिरस्कार करीत व एकमेकांचीं नांवें घेऊन आव्हान करीत पुढें सरसावले व परस्परांशीं द्वन्द्वयुद्ध करूं लागले ॥ २७ ॥ हे राजा, त्यांत इंद्राबरोबर बलिराजा युद्ध करूं लागला, तारकासुराबरोबर षडानन, हेतीशीं वरुण आणि प्रहेतीशीं मित्र असे द्वंद्वयुद्ध करूं लागले ॥ २८ ॥ हे शत्रुदमना, कालनाभाशीं यम, मयासुराशीं विश्वकर्मा, त्वष्ट्याशीं शंबर, सवित्याशीं विरोचन, अपराजिताशी नमुचि, वृषपर्व्याशीं अश्विनीकुमार, बाणासुरप्रभृति बलीच्या शंभर पुत्रांशीं सूर्यदेव युद्ध करूं लागला ॥ २९ ॥ ३० ॥ राहूशीं चंद्र, पुलोम्याशीं वायु, शुंभनिशुंभांशीं महावेगवती देवी भद्रकाली, जंभासुराशीं विभावसु, ब्रह्मपुत्राशीं वातापीसहित इल्वल अशीं द्वंद्वयुद्धें सुरू झालीं ॥ ३१ ॥ ३२ ॥ कामदेवांशीं दुर्मर्ष, मातृगणांशीं उत्कल, शुक्राचार्यांशीं बृहस्पति, नरकासुराशीं शनैश्चर, निवातकवचाशीं मरुद्‌गण, कालेयांशीं वसुनामक देव, पौलोमांविरुद्ध विश्वेदेव व क्रोधवशनामक दैत्यगणांविरुद्ध एकादश रुद्र असे युद्ध करूं लागले ॥ ३३ ॥ ३४ ॥ ह्याप्रमाणें ते असुर व देव, युद्धभूमीमध्यें जोड्या जोड्या करून द्वंद्वयुद्ध करीत असतां, वेगानें परस्परांच्या अंगांवर धावून तीक्ष्ण बाण, खड्ग आणि तोमर ह्यांचे प्रहार करूं लागले ॥ ३५ ॥ भुशुंडि, चक्रें, गदा, खड्ग, पट्टे, शक्ति, उल्मुक, प्रास, परशु, निस्त्रिंश, भाले, परिघ, मुद्गर आणि गोफणी ह्या आयुधांनीं त्यांनीं परस्प-

रांचीं मस्तकें फोडलीं ॥ ३६ ॥ त्या काळीं हत्ती, घोडे, रथावर बसलेले रथी, पायदळ व आपल्यावर आरूढ झालेल्या स्वारांसह उष्ट्रादिक सर्व वाहनें व रथ यांचे तुकडे तुकडे होऊन पडले. कित्येकांचे बाहु, मांड्या, माना व पाय तुटून पडले आणि कित्येकांचे ध्वज, धनुष्यें, कवचें व अलंकार छिन्नभिन्न झाले ॥ ३७ ॥ त्या काळीं देव व दैत्य यांच्या पायांच्या आघातांनीं तसेंच त्यांच्या रथांच्या चाकांनीं चूर्ण झालेल्या रणभूमीपासून इतकी धूळ उडाली कीं, तिनें आकाश, दिशा व सूर्य ह्यांना आच्छादून टाकिलें; पण पुढें रक्तप्रवाहानें ती धूळ भिजून गेली व त्यामुळें ती पुनः जमिनीवर पडली ! ॥ ३८ ॥ त्या रणभूमीवर ज्यांची किरीटकुंडलें पडून गेलीं आहेत आणि ज्यांची दृष्टि क्रोधयुक्त असून ओंठ चावलेले दिसत आहेत अशीं मस्तकें विखुरलीं होतीं. आयुधांसह भूषणांनीं युक्त अशा तुटलेल्या भुजांनीं आणि हत्तीच्या सोंडेसारख्या मांड्यांनीं ती आच्छादित झाली होती ॥ ३९ ॥ त्या युद्धामध्यें हातांत आयुधें धरलेलीं कित्येक धडें आपल्या तुटलेल्या मस्तकांतील नेत्रांनीं पाहात योद्ध्यांच्या अंगांवर धांवत जाऊन पडूं लागलीं ॥ ४० ॥ त्या युद्धामध्यें बलिराजानें दहा बाणांनीं महेंद्राला, तीन बाणांनीं ऐरावताला, चार बाणांनीं ऐरावताच्या चार पादरक्षकांना आणि एका बाणानें महाताला प्रहार केला ॥ ४१ ॥ परंतु शीघ्रपराक्रमी अशी इंद्रानें ते बाण आपणांपर्यंत आले नाहींत तोंच तीक्ष्ण अशा तितक्याच भल्लनामक बाणांनीं त्यांचे हंसत हंसत तुकडे करून टाकिले ॥ ४२ ॥ इंद्राचा तो पराक्रम पाहून बलीला फार वैषम्य वाटलें आणि त्यानें इंद्राला मारण्याकरितां शक्ति नांवाचें आयुध घेतलें; पण मोठ्या ज्वाळेप्रमाणें जाज्वल्य अशी ती शक्तिसुद्धां त्याच्या हातांत असतांनाच इंद्रानें तोडून टाकिली ॥ ४३ ॥ त्यानंतर बलीनें शूळ घेतला. नंतर तोमर, दुधारी, खड्ग इत्यादि आयुधें घेतलीं; पण जें जें म्हणून आयुध इन्द्राला मारण्याकरितां त्यानें घेतलें तें तें त्या समर्थ अशा इंद्रानें तोडून टाकिलें ॥ ४४ ॥ हे राजा, हा प्रकार पाहून बलिराजानें गुप्त रूप धारण करून आसुरी माया उत्पन्न केली. तीमुळें देवसैन्याच्या डोक्यावर आकाशामध्यें प्रथम एक पर्वत उत्पन्न झाला ॥ ४५ ॥ मग त्या पर्वतापासून वणव्यांत जळत असलेले वृक्ष आणि देवरूप शत्रूंच्या सैन्याचें चूर्ण करणाऱ्या टांकीसारख्या तीक्ष्ण टोंकाच्या शिळा खालीं पडूं लागल्या ॥ ४६ ॥ तसेंच मोठमोठे सर्प, विंचू, मोठमोठ्या गजांचा चुराडा करणारे सिंह, वाघ व डुक्कर इत्यादि प्राणी देवांसमोर येऊं लागले ॥ ४७ ॥ हे राजा, याशिवाय हातांत शूळ धारण करून 'तोडा फोडा !' असें ओरडणाऱ्या शेंकडों नग्न राक्षसी व तसेच राक्षसांचे थवेहि चालून येऊं लागले ॥ ४८ ॥ नंतर गंभीर शब्द करणारे आणि वायूनीं प्रेरित झालेले मोठमोठे मेघ आकाशांत दिसूं लागले व मोठा गडगडाट करून ते जळजळीत निखाऱ्यांचा वर्षाव करूं लागले ॥ ४९ ॥ त्यानंतर दैत्यराज बलीनें अतिभयंकर अग्नि उत्पन्न केला. प्रलयकाळाच्या अग्नीप्रमाणें, प्रचंड वाऱ्यामुळें सारख्या भडकणाऱ्या अशा त्या अग्नीनें देवांना होरपळून टाकिलें ॥ ५० ॥ नंतर प्रचंड वायूनीं उसळलेल्या लाटा व भोंवरे ह्यांच्या योगानें भयंकर दिसणारा समुद्र, आपल्या मर्यादेचें उल्लंघन करून चोहोंकडून पसरूं लागला ॥ ५१ ॥ आपल्या हालचाली गुप्त

ठेवून असुरांनीं असा भयंकर मारा सुरू केल्यामुळें देवांचे सेनापति खिन्न झाले ॥ ५२ ॥ हे राजा, मग जेव्हां दैत्यांनीं निर्माण केलेल्या मायांच्या प्रतिकाराचा उपाय इंद्रादि देवांना कळेनासा, झाला, तेव्हां त्यांनीं विश्वपालक भगवंताचें चिंतन केलें, लगेच तो तेथें प्रगट झाला ॥ ५३ ॥ त्यानें आपले सुंदर पाय गरुडाच्या स्कंधावर ठेविले होते व कमरेला पीतांबर गुंडाळिला होता. त्याचे नेत्र नूतन कमळासारखे तेजस्वी होते. त्याच्या आठ हातांत आठ आयुधें, वक्षःस्थलावर लक्ष्मी, कंठांत कौस्तुभमणि, मस्तकावर अत्यंत मूल्यवान् किरीट व कानांत मकराकार कुंडलें शोभत होतीं ॥ ५४ ॥ भगवान् विष्णु देवसैन्यामध्यें प्रविष्ट होतांच, जाग्रदवस्था प्राप्त झाली असतां स्वप्न जसें एकदम नाहींसें होतें, त्याप्रमाणें मंत्रादि प्रयोगापासून उत्पन्न झालेल्या असुरांच्या त्या सर्व माया नाहींशा झाल्या. कारण श्रीहरीचें स्मरणच सर्व विपत्तींचा नाश करणारें आहे ॥ ५५ ॥ हे राजा गरुडावर बसलेल्या श्रीहरीला युद्धामध्यें आलेला पाहतांच सिंहावर बसलेल्या कालनेमीनामक दैत्यानें आपला शूळ गरगर फिरवून त्याच्या अंगावर फेंकला. तो शूळ गरुडाच्या मस्तकावर पडत आहे, इतक्यांत त्रैलोक्याधिपति श्रीहरीनें अनायासानें तो झेलून त्यानेंच त्या कालनेमीचा त्याच्या वाहनासह वध केला ॥ ५६ ॥ तेव्हां महाबलाढ्य असे माली व सुमाली हे दोघे दैत्य युद्ध करण्याणाठीं भगवंताच्या अंगावर धावून आले; परंतु भगवंताच्या चक्रानें त्यांचीं मस्तकें तत्काल तुटून पडलीं. नंतर माल्यवान्नामक असुरानें तीक्ष्ण गदेनें त्या भगवंताला प्रहार करून गरुडालाहि प्रहार करण्याकरितां पुन: गदा उचलली, तों आदिपुरुष श्रीहरीनें या गर्जना करणाऱ्या दैत्याचें मस्तक चक्रानें तोडून टाकिलें ॥ ५७ ॥

**अध्याय दहावा समाप्त**

---

# अध्याय ११ वा

शुकाचार्य म्हणाले,– हे परीक्षित्राजा, मग पुरुषोत्तमाच्या परम कृपेमुळें इंद्रवायुप्रभृति देवांचें अंत:करण शांत झालें असतां पूर्वी ज्या ज्या दैत्यांनीं त्यांना युद्धांत प्रहार केले होते त्यांना त्यांना ते आता उलट प्रहार करूं लागले ॥ १ ॥ भगवान् इंद्रानें क्रुद्ध होऊन विरोचनपुत्र बलीला मारण्याकरितां जेव्हां वज्र उगारिलें, तेव्हां सर्व दैत्य हाहा:कार करूं लागले ॥ २ ॥ धैर्यवान्, युद्धसामग्रीनें युक्त आणि त्या घोर संग्रामामध्यें निर्भयपणानें संचार करीत आपल्या समोर येत असलेल्या त्या बलीला वज्रपाणि इंद्र तिरस्कारपूर्वक म्हणाला ॥ ३ ॥ हे मूढा, जसा कपटी पुरुष मंत्रादिकांच्या प्रभावानें भ्रांतनेत्र झालेल्या अज्ञ लोकांना आपल्या स्वाधीन करून घेतो आणि त्यांचें धन हरण करितो त्याप्रमाणें तूं मायांच्या योगानें आम्हां मायाधिपतींना जिंकण्याची इच्छा करीत आहेस; परंतु तुझ्या मायांचें प्राबल्य आमच्या ठिकाणीं कांहीं चालावयाचें नाहीं ॥ ४ ॥ जे पुरुष आपल्या मायांच्या योगानें स्वर्गावर आरोहण व नंतर त्याच्याहि पलीकडे मोक्षास जाण्याची इच्छा करीत असतील, त्या मूढ चोरांना त्यांच्या मूळच्या स्थानापेक्षांहि मीं खालीं पाडितों ॥५॥ हे मंदबुद्धे बले, आतांच पाहा, शंभर गांठीच्या या वज्रानें कपटी असें तुझें शिर मीं छेदून टाकतों. तरी, आपलें रक्षण करण्यासाठीं तूं आपल्या ज्ञातिजनांसह प्रयत्न कर ॥ ६ ॥

बलि म्हणाला,—‘ हे इंद्रा, कीर्ति, जय, पराजय इत्यादिकांना अनुकूळ असलेल्या काळानेंच ज्यांना कर्माची प्रेरणा केली आहे, अशा युद्ध करीत असलेल्या सर्वांनाच अनुक्रमानें कीर्ति, जय, अपजय व मृत्यु हे प्राप्त होतात ॥ ७ ॥ अर्थात् ज्ञानी पुरुष त्यांविषयीं हर्ष पावत नाहींत व शोकहि करीत नाहींत; परंतु, त्या बाबतींत तुम्ही मात्र अज्ञानी आहां ॥८॥ यास्तव त्या कीर्ति, जय इत्यादि गोष्टी आपल्याच हातीं आहेत असें मानणाऱ्या तुमच्या मर्मभेदक शब्दांची आम्ही क्षिति बाळगीत नाहीं. साधु पुरुष ह्याबद्दल तुमची कींवच करितात ’॥ ९ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, प्रतिपक्षी वीरांचें मर्दन करणाऱ्या त्या पराक्रमी दैत्यराज बलीनें ह्याप्रमाणें महेंद्राची निंदा करून ताडण केलेल्या त्या इंद्राला आकर्ण ओढिलेल्या बाणांनीं पुन: ताडण केलें ॥ १० ॥ याप्रमाणें खरें भाषण करणाऱ्या त्या बलीनें इंद्राची निर्भर्त्सना केली असता, अंकुशानें टोंचिलेल्या हत्तीला जसें तें टोंचणें सहन होत नाहीं, त्याप्रमाणें ते निर्भर्त्सनेचे शब्द इन्द्रालाहि सहन झाले नाहींत ॥ ११ ॥ त्या शत्रुनाशक इंद्रानें आपल्या अमोघ वज्रानें त्या बलिराजाला प्रहार केला व त्यामुळें पंख तुटलेल्या पर्वताप्रमाणें बलि विमानासह भूमीवर पडला. ॥ १२ ॥ त्या वेळीं

बलीवर प्रेम करणारा त्याचा मित्र जो जंभासुर, वज्राच्या तडाक्यांत सांपडलेल्या आपल्या मित्राला भूमीवर पडलेला पाहून त्याला साहाय्य करण्याकरितां तेथें चाल करून आला ॥ १३ ॥ सिंहारूढ झालेल्या त्या अत्यंत महाबलाढ्य जंभासुरानें इंद्राजवळ येऊन आपली गदा उचलली आणि मोठ्या वेगानें इंद्राच्या व ऐरावताच्या मानेवर प्रहार केला ॥ १४ ॥ त्या गदाप्रहारानें अत्यंत व्याकुळ झालेला तो गज विव्हळूं लागला व त्याचे गुडघे जमिनीला लागून तो मूर्च्छित झाला ॥ १५ ॥ हा प्रकार पाहतांच सहस्र अश्व जोडलेला असा रथ मातलीनें इंद्राजवळ आणिला. त्याबरोबर इंद्रानें ऐरावताला सोडून त्या रथावर आरोहण केलें ॥ १६ ॥ इन्द्राच्या सारथ्याच्या या तत्परतेची दैत्यश्रेष्ठ जंभासुरानेंहि प्रशंसा केली व आश्चर्य करीत त्या संग्रामामध्यें आपल्या जाज्वल्यमान शूलाचा त्याच्यावर प्रहार केला ॥ १७ ॥ पण मातलीनें धैर्य धरून तो दुःसह प्रहार सहन केला. नंतर इंद्रानें क्रुद्ध होऊन आपल्या वज्रानें जंभासुराचें शिर छेदून टाकिलें ॥ १८ ॥ याप्रमाणें जंभासुराचा वध झाला हें वर्तमान नारदानें जाऊन नमुचि, बल व पाक यांना सांगितलें. तें ऐकतांच त्याचे हे तिघे बांधव मोठ्या त्वरेनें त्या युद्धभूमीवर प्राप्त झाले ॥ १९ ॥ तेथें येतांच त्यांनीं कठोर शब्दांनीं इंद्राची मर्मभेदक निन्दा केली व मेघ जसे जलधारांचा पर्वतावर वर्षाव करून त्याला आच्छादित करितात त्याप्रमाणें त्यांनीं बाणाच्या वर्षावानें इंद्राला आच्छादून टाकिलें ॥ २० ॥ त्यांत शीघ्र पराक्रमी अशा बलासुरानें इंद्राच्या हजार घोड्यांना हजार बाणांनीं समरभूमीवर एकदम घायाळ केलें ॥ २१ ॥ पाकासुरानेंहि एकदम दोनशें बाण धनुष्यावर लावून सोडिले व त्याच्या योगानें मातलीला चीत करून रथाचे निरनिराळे भागहि तोडून टाकिले. पाकासुराचा हा पराक्रम त्या युद्धामध्यें मोठा आश्चर्यकारक होता ॥ २२ ॥ नमुचिनामक असुरानें पंधरा सोन्याच्या मुठीचे बाण सोडून त्या संग्रामामध्यें इंद्राला ताडिलें आणि पाण्यानें भरलेल्या मेघाप्रमाणें तो गर्जना करूं लागला ॥ २३ ॥ इतरहि असुरांनीं त्याच्याप्रमाणें केलें व जसें मेघांनीं वर्षाकाळांतील सूर्याला चोहोंकडून आच्छादावें, त्याप्रमाणें सारथी व रथ ह्यांसह इंद्राच्या सर्व बाजूंनीं बाणांचें जाळें करून त्याला आच्छादित केलें ॥ २४ ॥ तेव्हां समुद्रामध्यें नौका फुटलेले व्यापारी लोक जसे आक्रोश करूं लागतात त्याप्रमाणें शत्रुसेनेनें पराजित केलेले नायकरहित असे ते देवगण, इंद्र दृष्टीस न पडल्यामुळें अत्यंत विव्हळ होऊन अनुयायांसह आक्रोश करूं लागले ॥ २५ ॥ परंतु रात्र संपली असतां ज्याप्रमाणें सूर्य आपल्या तेजानें दिशा, आकाश व पृथ्वी यांना प्रकाशित करीत क्षितिजावर शोभूं लागतो, त्याप्रमाणें इंद्रहि अश्व, रथ, ध्वज व सारथि ह्यांसह बाणांच्या पिंजऱ्यांतून बाहेर निघाला आणि आपल्या तेजानें दिशा, आकाश व पृथ्वी यांस प्रकाशित करूं लागला ॥ २६ ॥ तेव्हां आपली सेना शत्रूंनीं गांजून सोडली आहे असें पाहून त्या वज्रधारी इंद्रानें शत्रूचा पराजय करण्याकरितां मोठ्या क्रोधानें आपलें वज्र उगारिलें ॥ २७ ॥ हे राजा, त्या आठधारी वज्रास दैत्यांचे ज्ञातिबांधव भयग्रस्त दृष्टीनें पाहात आहेत तोंच त्यांच्या समक्ष बल व पाक ह्या दोन्ही असुरांचीं मस्तकें त्यानें

छेदिलीं ॥ २८ ॥ हे राजा, त्या असुरांचा वध झालेला पाहतांच नमुचि शोक करूं लागला आणि विष्णूविषयीं मत्सरानें क्षुब्ध होऊन इंद्राचा वध करण्याकरितां त्यानें दीर्घ प्रयत्न केला ॥ २९ ॥ त्यानें मोठ्या रागानें घुंगुर लाविलेला सोन्याच्या टोपगाचा लोखंडी शूल घेतला व इंद्राची निर्भर्त्सना करीत तो त्याच्या अंगावर धावला आणि सिंहाप्रमाणें गर्जना करून' इंद्रा, हा पाहा मेलास ! असें म्हणून त्यानें 'इंद्राच्या अंगावर तो शूल त्वेषानें फेंकिला ॥ ३० ॥ पण हे राजा, आपणाकडे मोठ्या वेगानें येत असलेल्या त्या शूलाचे वाटेंतच देवराज इंद्रानें आपल्या बाणांनीं हजारों तुकडे करून टाकिले आणि सक्रोध आवेशानें त्या असुराचें शिर छेदण्याकरितां त्याच्या कंठावर देवेंद्रानें वज्राचा प्रहार केला ॥ ३१ ॥परंतु देवराज इंद्रानें मोठ्या जोरानें फेंकलेल्या महाप्रभावशाली वज्रानें त्या असुराची त्वचाहि दुखवली नाहीं! हें पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें. कारण, ज्यानें पूर्वीं अतिवीर्यवान् अशा वृत्रासुराचाहि वध केला, त्या वज्राला या वेळीं नमुचीच्या कंठाच्या त्वचेनेंहि धुडकावून लाविलें ! ॥ ३२ ॥ हे राजा, याप्रमाणें आपलें वज्र कुंठित झालेलें पाहून मात्र इंद्र भयभीत झाला आणि मनांत म्हणाला,–' अहो, लोकांना मोह पाडणारें असें हें दैवानें केलें तरी काय ? ॥ ३३ ॥ अहो, पूर्वीं पंखांवर यथेष्ट उडणाऱ्या व आपल्या भारानें पुनः भूमीवर बसणाऱ्या पर्वतांमुळें प्रजांचा नाश होऊं लागला असतां, ज्या वज्राच्या योगानें मीं त्या पर्वताचे पंख छेदिले, त्वष्ट्याचें मूर्तिमंत तपच असा जो वृत्रासुर त्याचाहि ज्याच्या योगानें मीं नाश केला व इतर सर्व अस्त्रांनीं ज्याच्या त्वचेलाहि धक्का लागावयाचा नाहीं अशा बलाढ्य इतर वीरांचाहि ज्याच्या योगानें मीं वध केला, तें हें वज्र, ह्या क्षुद्र असुरावर मीं टाकिलें असतां आज कुंठित झालें. यास्तव ब्रह्मतेजोरूप असूनहि निरुपयोगी झालेल्या अशा ह्या काण्डतुल्य वज्राचा मी आतां स्वीकारच करणार नाहीं॥ ३४॥ ॥ ३५ ॥ ३६ ॥ ह्याप्रमाणें खिन्नांतःकरणानें इंद्र विचार करीत आहे, तों पुढीलप्रमाणें आकाशवाणी झाली. 'हे इंद्रा, हा नमुचि दानव शुष्क अथवा आर्द्र वस्तूंनीं मरणार नाहीं. कारण, आर्द्र अथवा शुष्क ह्यांपासून तुला मृत्यु येणार नाहीं असा मीं याला वर दिला आहे तरी हे इंद्रा, या शत्रूच्या वधाकरितां तूं दुसरा कांहीं तरी उपाय शोधून काढ' ॥ ३७ ॥ ॥ ३८ ॥ हे राजा, ती आकाशवाणी ऐकून स्वस्थ अंतःकरणपूर्वक इंद्र चिंतन करीत असतां, ओलेंहि नव्हे शुष्कहि नव्हे, असा पाण्याचा फेंस त्याच्या लक्षांत आला आणि त्याप्रमाणें केवळ शुष्क नव्हे व केवळ आर्द्रहि नव्हे अशा फेसानें त्या नमुचीचें शिर देवेंद्रानें उडविलें. त्याबरोबर मुनिगणांनीं स्तुति करून त्याच्यावर फुलें उधळलीं ॥ ३९ ॥ ४० ॥ नमुचि गतप्राण होतांच गंधर्वश्रेष्ठ विश्वावसु व परावसु त्याचे गुण गाऊं लागले, देवांच्या दुंदुभि वाजूं लागल्या आणि अप्सरा आनंदानें नृत्य करूं लागल्या ॥ ४१ ॥ नमुचीचा वध होतांच, अग्नि, वायु, वरुण इत्यादि देवांनीं अस्त्रसमूहांच्या योगानें आपल्याशीं द्वंद्वयुद्ध करणाऱ्या प्रतिपक्ष्यांचा, जसे सिंह हरिणांचा नाश करितात त्याप्रमाणें नाश केला ॥ ४२ ॥ हे राजा, त्या प्रसंगीं दानवांचा अगदीं क्षय होत आहे असें पाहून, ब्रह्मदेवानें पाठविलेल्या देवर्षि नारदानें देवांचें निवारण केलें ॥ ४३ ॥

नारद म्हणाला,—'हे देव हो, नारायणाच्या बाहूंचा आश्रय केल्यामुळें तुम्हांला, अमृत प्राप्त झालें व ऐश्वर्य मिळून तुमचा मोठा उत्कर्ष झाला आहे, तरी तुम्ही आतां युद्ध पुरें करा. ॥ ४४ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, त्या नारदाच्या वचनाला मान देऊन सर्व देवांनीं आपला क्रोध शांत केला आणि आपली स्तुति करणाऱ्या गंधर्वादिक अनुचरांसह ते स्वर्गीं निघून गेले ॥ ४५ ॥ नंतर त्या संग्रामामध्यें जे असुर अवशेष राहिले होते ते नारदाच्या संमतीनें, वज्रप्रहारानें व्याकुळ झालेल्या बलीला घेऊन अस्ताचलावर गेले ॥ ४६ ॥ त्या ठिकाणीं,ज्यांचीं मस्तकें शाबूत होतीं व ज्यांचे अवयवहि नीटनेटके होते अशा त्या असुरांना आपल्या संजीविनीनामक विद्येनें शुक्राचार्यानें जिवंत केलें ॥४७॥ बलिराजाचीं इंद्रियें तर शुक्राचार्यानें स्पर्श करतांक्षणींच पुनरपि ताजींतवानीं झालीं आणि तो लोकव्यवहार जाणणारा असल्यामुळें पराभव पावला असूनहि खिन्न झाला नाहीं ॥ ४८ ॥

## अकरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १२ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्राजा, स्त्रीरूपानें दानवांना मोहित करून श्रीहरीनें देवगणांना अमृत पाजिलें, हें वर्तमान वृषभध्वज महादेवानें जेव्हां ऐकलें. तेव्हां तें मोहिनीरूप अवलोकन करण्याकरितां, तो पार्वतीसह नंदीवर आरूढ झाला. सर्व भूतगणांना बरोबर घेऊन जेथें मधुसूदन भगवान् होता तेथें प्राप्त झाला ॥ १ ॥ २ ॥ तेव्हां भगवान् विष्णूनें आदरपूर्वक त्या शंकराचें पार्वतीसह अभिनंदन करून त्यांचा सत्कार केला. नंतर विष्णूनें दिलेल्या आसनावर तीं उभयतां स्वस्थपणें बसल्यावर त्यानेंहि श्रीहरीचा उलट सत्कार केला आणि हंसत हंसत त्याला प्रश्न केला ॥ ३ ॥

भगवान् महादेव म्हणाला,—हे जगदीशा, हे जगन्मया, हे जगद्व्यापिन्, हे देवाधिदेवा, सर्व पदार्थांचा आत्मा व कारण असल्यामुळें तूं सर्वसमर्थ आहेस ॥ ४ ॥ ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं ज्यापासून होतात व जें स्वतः अविनाशी असून या तीहींपासून अलिप्त आहे, तसेंच जें ह्या बाह्य जगाच्या रूपानें भोग्य असून, दुसऱ्या आंतर अशा अहंकाररूपानें त्या जगाचा उपभोगहि घेणारें आहे तें सत्य व चैतन्यस्वरूप ब्रह्म तूंच आहेस ॥५॥ हे प्रभो, इहलोकासंबंधीं भोगांचा त्याग करून निष्काम झालेले मुमुक्षु मुनीजन, तुझ्याच चरणकमलाची आदरपूर्वक उपासना करितात ॥ ६ ॥ हे परमेश्वरा, तूं निर्गुण, शोकरहित, निर्विकार, आनंदमय. सर्वव्यापक व सर्वांहून निराळें सुखरूप आणि परिपूर्ण असें ब्रह्म असून, प्रपंचाच्या उत्पत्तिस्थितिलयाचें कारणहि तूंच आहेस. तूं स्वतः निरपेक्ष असून आपणांला आपल्या कर्मांचीं फळें मिळविण्याकरितां जे तुझी अपेक्षा करितात, तेवढ्यापुरताच त्या जीवांचा तूं स्वामी होतोस ॥ ७ ॥ हे जगदीशा, द्वैतरूपानें भासणारें कार्य व अद्वैतरूपानें प्रतीतीस येणारें कारण, हीं दोन्ही एकटा तूंच असल्यामुळें, कृतीनें बनविलेले कुंडलादि अलंकार व मूळची सोन्याची लगड, हीं जशीं वस्तुतः एकच होत, तसाच तुझ्या ठिकाणीं वस्तुतः भेद नसून अज्ञानामुळें लोकांनींच तो कल्पिला आहे. कारण उपाधिरहित अशा तुझ्या ठिकाणीं जो भेद अनुभवास येतो, तो स्वतः सिद्ध नसून मायेच्या गुणांमुळेंच होय ॥ ८ ॥ हे जगदीशा, वेदांती तुला ब्रह्म म्हणतात, मीमांसक तुला धर्म म्हणतात, सांख्य तुला प्रकृतिपुरुषांहून भिन्न असा पुरुषश्रेष्ठ ईश्वर समजतात, पांच रात्र तुला नऊ शक्तींनीं युक्त असा परमेश्वर मानितात व पातंजलमताचे योगी तुला जन्मादिविकाररहित असा स्वतंत्र महापुरुष समजतात॥ ९॥मी, ब्रह्मदेव व मरीचिप्रभृति ऋषि हे सर्वहि सत्त्वगुणापासून उत्पन्न झालेले असूनहि मायेनें मोहितचित्त झाल्यामुळें तुझी कृति यथार्थ रीतीनें जाणत नाहींत. आमची जेथें ही दशा, तेथें हे ईश्वरा, सर्वदा पापकर्म करणारे दैत्य व मनुष्यादि तुला कसें बरें जाणतील ? ॥१०॥ हे परमेश्वरा, तूं सर्व जगताचा आत्मा असा ज्ञान स्वरूपी असल्यामुळें, वायु जसा चराचर प्राणिमात्रांच्या देहांत व आकाशांत प्रवेश करितो,

त्याप्रमाणें तूंहि सर्व जगांत प्रविष्ट होऊन आपण केलेल्या जगाचे उत्पत्ति, स्थिति व नाश प्राणिमात्रांचें कर्म, जगताला प्राप्त झालेला संसारबंध व त्यापासून होणारा मोक्ष ह्या सर्वांना जाणत आहेस ॥ ११ ॥ हे ईश्वरा, सत्त्वादिक गुणांमध्यें रममाण होणाऱ्या तुझे नरसिंहादिक अवतार मीं पूर्वीं अवलोकन केले. तसेंच अमृतमंथनप्रसंगीं तूं जें स्त्रीरूप धारण केलें होतेंस, तें पाहाण्याची मला इच्छा झाली आहे ॥१२॥ ज्या रूपानें तूं दैत्यांना मोहित करून देवांना अमृत पाजिलेंस, तें तुझें रूप पाहाण्याकरितां आम्ही सर्व उत्सुक झालों आहों; कारण त्याविषयीं आम्हांला फारच आश्चर्य वाटत आहे ॥ १३ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, ह्याप्रमाणें शूलपाणि शंकरानें प्रार्थना केली असतां, भगवान् विष्णु गंभीर अभिप्रायानें हास्य करून त्या महादेवाला म्हणाला ॥ १४॥

भगवान् म्हणाला:—हे शंकरा, अमृताचें पात्र दैत्यांच्या हस्तगत झालें असतां, देवांचें कार्य कसें होईल, असा विचार करीत असतां दैत्यांना मोह पाडल्यानें तें होईल, असें जाणून तो स्त्रीवेष मीं धारण केला ॥ १५ ॥ असो. हे सुरश्रेष्ठा, कामोत्पादक व कामिजनांना अत्यंत आवडणारें असें तें रूप अवलोकन करण्याची तुला जर इच्छाच आहे तर तें मी तुला दाखवितों ॥ १६ ॥

शुकाचार्य म्हणाले—हे राजा, ह्याप्रमाणें महादेवाबरोबर भाषण करीत असतां, भगवान् विष्णु तेथेंच अंतर्धान पावला व पार्वतीसह महादेव मात्र इकडेतिकडे पाहातच राहिला ॥ १७ ॥ इतक्यांत चित्रविचित्र फुलें व तांबूस रंगाचीं कोंवळीं पानें ह्यांनीं युक्त असलेले वृक्ष ज्यामध्यें आहेत, अशा उपवनामध्यें एक सुंदर स्त्री त्या महादेवाच्या दृष्टीस पडली. ती चेंडूशीं खेळत होती. तिनें झकपकीत रेशमी शालू परिधान करून त्याच्यावरून कमरपट्टा घातला होता ॥ १८ ॥ वर उडणाऱ्या व खालीं पडणाऱ्या चेंडूच्या गतीबरोबर ती देखील वारंवार खालीं वांके व ताठ होई. त्यामुळें तिचे स्तन कंपित होत होते. गळ्यांतील सर्वोत्कृष्ट हारांच्या भारामुळें ती पदोपदीं खालीं वांके तेव्हां कमरेंत मोडली आहे कीं असें वाटे. कोंवळ्या पानांप्रमाणें तिचे पाय नाजूक होते व चेंडूबरोबर ती इकडे तिकडे फिरत होती ॥ १९ ॥ इतस्ततः उडणाऱ्या चेंडूच्या चपळ गतीमुळें तिच्या विशाल नेत्रांतील बुबुळें फारच चंचल व उद्विग्न झालीं होतीं; कानांत झळकणाऱ्या कुंडलांच्या कांतीनें तिचे गाल दैदीप्यमान झाले होते; काळ्या भोर केसांनीं तिच्या मुखाला फारच शोभा आली होती ॥ २० ॥ सैल होत असलेलें वस्त्र व सुटत असलेली वेणी आपल्या मनोहर डाव्या हातानें ती सांवरीत होती व दुसऱ्या हातानें चेंडूला प्रहार करीत करीत आपल्या मायेनें सर्व जगताला मोह उत्पन्न करीत होती ॥ २१ ॥ अशा त्या स्त्रीला पाहातांक्षणींच आपल्याजवळ पार्वती, तसेंच आपले पार्षदगण आहेत यांचें भान विसरून शंकर मोहित झाला आणि कंदुकक्रीडेमुळें किंचित् लज्जित होऊन मंदहास्यपूर्वक तिनें फेंकलेल्या कटाक्षानें त्याला अगदीं जर्जर केलें. त्यानें त्या स्त्रीकडे

दृष्टि लावतांच तिनेंहि उलट त्यावर आपले कटाक्ष असे फेंकिले कीं, त्यांच्या योगानें त्याचें मन अगदीं विव्हळ होऊन गेलें ॥ २२ ॥ इतक्यांत तिच्या हातांतील चेंडू दूर उडाला. तो झेलण्याकरितां त्याच्या मागोमाग ती जाऊं लागली. तोंच कमरपट्ट्यासह तिचें झिरझिरीत वस्त्र महादेवाच्या समक्ष वायूनें उडवून टाकिलें ॥ २३ ॥ याप्रमाणें सुंदर नेत्रकटाक्ष फेंकणाऱ्या, दर्शनीय व मनोरम अशा त्या स्त्रीला पाहून तिच्यावर आपली आसक्ति दर्शविणाऱ्या महादेवाचें मन व्याकुळ झालें ॥ २४ ॥ त्याची विचारशक्ति नाहींशी झाली. तिच्या विषयींच्या कामवासनेमुळें तो विव्हळ झाला आणि देवी भवानी पाहात असतांहि निर्लज्ज होऊन तो त्या स्त्रीकडे जावयास निघाला ॥ २५ ॥ महादेव आपल्याकडे येत आहे असें पाहून वस्त्ररहित असल्यामुळें त्या स्त्रीला अत्यंत लज्जा वाटली व ती एका ठिकाणीं उभी न राहतां हंसत हंसत वृक्षाआड लपूं लागली ॥ २६ ॥ त्या वेळीं कामाच्या स्वाधीन झालेल्या त्या भगवान् महादेवाचें चित्त अवस्थ झालें आणि कामातुर झालेला गजेंद्र जसा हत्तिणीच्या मागोमाग धावूं लागतो, त्याप्रमाणें तो त्या स्त्रीच्या मागोमाग धावूं लागला ॥ २७ ॥ मोठ्या वेगानें तिच्या मागोमाग धांवत जाऊन ती झिडकारित असतांहि त्यानें तिची वेणी धरिली आणि तिला आपल्या दोन्ही बाहूंनीं दृढ आलिंगन दिलें ॥ २८ ॥ याप्रमाणें जसा हत्ती हत्तिणीला आलिंगन देतो, त्याप्रमाणें भगवान् महादेवानें त्या स्त्रीला बलात्कारानें आलिंगन दिलें असतां तिचे केस अस्ताव्यस्त होऊन ती इकडेतिकडे चळवळ करूं लागली ॥ २९ ॥ हे राजा, त्या देवनिर्मित मायावी स्त्रीचा नितंबभाग स्थूल होता, तरी तिनें भगवान् महादेवाच्या हातून आपणाला सोडवून घेतलें आणि ती दूर पळून गेली ॥ ३० ॥ भगवान् शंकर कामरूप शत्रूनें जिंकिल्यासारखा अगदीं परवश झाला आणि अद्भुत लीला करणाऱ्या त्या स्त्री रूपधारी विष्णूच्या मागून धावूं लागला ॥ ३१ ॥ तेव्हां गर्भधारणाची वेळ प्राप्त झालेल्या गाईच्या मागोमाग धांवत असलेल्या मस्त बैलाप्रमाणें अमोघवीर्य शंकराचा वीर्यपात होऊं लागला ॥ ३२ ॥ हे राजा, पृथ्वीवर जेथें जेथें त्या महात्म्या शंकराचें वीर्य पडलें त्या जागीं रुप्याच्या व सोन्यांच्या खाणी झाल्या ॥ ३३ ॥ असो. तिच्या मागें धांवतां धांवतां नद्या, सरोवरें, पर्वत, वनें व उपवनें इत्यादि ज्या ज्या ठिकाणीं ऋषि वास करीत होते, तेथें तेथें तो महादेव गेला आणि वीर्यपतनामुळें तेथें त्याचा वास झाला ॥ ३४ ॥ असो. हे नृपश्रेष्ठा, याप्रमाणें रेतस्खलन झालें असतां भगवान् शंकर मोहापासून निवृत्त झाला आणि आपल्या हातून घडलेला वेडेपणा विष्णूच्या मायेनें मोहित झाल्यामुळें घडला, असें त्याला आढळून आलें ॥ ३५ ॥ अपरिमित योगमायासामर्थ्यानें युक्त अशा जगदात्म्या श्रीहरीचें माहात्म्य त्याला माहीत असल्यामुळें आपल्याला पडलेल्या मोहाचें त्याला अर्थातच आश्चर्य वाटलें नाहीं ॥ ३६ ॥ तो झालेल्या प्रकारानें गोंधळला नाहीं व लज्जितहि झाला नाहीं. असें पाहून भगवान् विष्णु अत्यंत संतुष्ट झाला आणि पुनः पुरुषस्वरूप धारण करून शंकराशीं बोलूं लागला ॥ ३७ ॥

श्रीभगवान् म्हणाला,—हे सुरश्रेष्ठा, माझ्या स्त्रीरूप मायेच्या योगानें तूं अगदीं यथेष्ट मोहित झालेला असूनहि स्वतःच पुनः पूर्वस्थितीला आलास हें फार उत्तम झालें ।। ३८ ।। नाना प्रकारचे विषय उत्पन्न करणारीं इंद्रियें ज्यांनीं जिंकिलीं नाहींत अशा पुरुषांना तरून जाण्यास कठीण अशा ह्या माझ्या मायेला तुजवांचून दुसरा कोणता बरें विषयासक्त पुरुष तरून जाऊं शकेल ? ।। ३९ ।। सत्त्वादि गुणविभागानें सृष्टि उत्पन्न करणाऱ्या मजकालरूपी परमेश्वराच्या आधीन असलेली ही त्रिगुणात्मक माया आजपासून तुला कधींच मोहित करण्यास समर्थ होणार नाहीं ।। ४० ।।

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें श्रीवत्सधारी भगवंतानें सत्कार केला असतां तो महादेव त्याचा निरोप घेऊन व त्याला प्रदक्षिणा करून आपल्या गणांसह आपल्या स्थानीं निघून गेला ।। ४१ ।। हे भरतकुलोत्पन्ना राजा, स्वस्थानीं गेल्यावर भगवान् शंकरानें आपली अंशभूत माया जी पार्वती तिला भगवन्मायेचें हें महात्म्य मोठमोठे ऋषि ऐकण्यास बसले असतां समजावून दिलें ।। ४२ ।। तो म्हणाला, हे देवि, जन्मादि विकार-शून्य अशा परमात्म्या पुरुषोत्तमाची माया तूं नीट पाहिलीस ना ? त्या मायेच्या योगानें भगवंताच्या अंशावतारामध्यें श्रेष्ठ असा मी रुद्रहि परवश होऊन मोह पावलों. मग इंद्रियादिकांच्या आधीन असलेले दुसरे लोक तिच्यामुळें मोहित होतील हें काय सांगावें ? ।। ४३ ।। असो. हे पार्वति, पूर्वीं सहस्र संवत्सरांच्या अंतीं समाधीपासून मी निवृत्त झालों असतां मजजवळ येऊन 'स्वतः परमेश्वर असून कोणाचें ध्यान करितां' ? असें ज्याच्याविषयीं तूं मला विचारिलें होतेंस व ज्याच्या ठिकाणीं कालाचा अथवा वेदाचा प्रवेश होत नाहीं, तोच हा खरोखर साक्षात् पुरुष होय ।। ४४ ।।

शुकाचार्य म्हणाले,– बा परीक्षित् राजा, समुद्रमंथनसमयीं ज्यानें आपल्या पृष्ठ-भागावर मंदरनामक महापर्वत धारण केला त्या शार्ङ्गधन्व्या भगवंताचा पराक्रम तुला मीं याप्रमाणें सांगितला ।। ४५ ।। हे राजा, जो पुरुष हें आख्यान वारंवार श्रवण करील अथवा दुसऱ्याला सांगेल त्याचा चांगला प्रयत्न कधींही निष्फळ होणार नाहीं. कारण परमेश्वराच्या गुणांचें वर्णन हें संसारसंबंधी सर्वच परिश्रम दूर करणारें आहे ।। ४६ ।। ज्या भगवंतानें मायेनें स्त्रीवेष धारण करून दैत्यरोहित केलें आणि दुर्जनांना दुर्जय व भक्तीनेंच मिळण्यास योग्य अशा आपल्या चरणीं शरण आलेल्या देवश्रेष्ठांना समुद्रमंथनापासून उत्पन्न झालेलें अमृत पाजिलें, त्या शरणागताच्या कामना परिपूर्ण करणाऱ्या परमात्म्याला मी नमस्कार करितों ।। ४७ ।।

**बारावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १३ वा

शुकाचार्य म्हणाले, —हे परीक्षित्‌राजा, सूर्याचा श्राद्धदेव म्हणून प्रसिद्ध असलेला जो पुत्र तो चालू असलेल्या सातव्या मन्वंतरांतील मनु होय. १ इक्ष्वाकु, २ नभग, ३ धृष्ट, ४ शर्याति, ५ नरिष्यंत, ६ नाभाग, ७ दिष्ट, ८ करूष, ९ पृषध्र आणि १० वसुमान्‌ असे एकंदर वैवस्वतमनूचे दहा पुत्र होत. हे राजा, आदित्य, वसु, रुद्र, विश्वेदेव, मरुद्गण, अश्विनीकुमार आणि ऋभुगण हे ह्या मन्वंतरांतील देव असून पुरंदर हा त्यांचा इंद्र आहे ॥ १ ॥२॥३॥४॥ तसेच कश्यप, अत्रि, वसिष्ठ, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, आणि भरद्वाज हे ह्या मन्वंतरांतील सप्तर्षि सांगितले आहेत ॥ ५ ॥ या मन्वंतरांत कश्यपापासून अदितीच्या पोटीं द्वादशादित्यांमध्यें कनिष्ठ असा जो वामनरूप धारण करणारा विष्णु तोच भगवंताचा अवतार झाला ॥ ६ ॥ असो. ह्याप्रमाणें सात मन्वंतरें मीं तुला संक्षेपानें सांगितलीं आहेत. आतां विष्णूच्या अवतारांनीं युक्त अशीं पुढें येणारीं मन्वंतरेंहि सांगतों ॥ ७ ॥ हे राजेंद्रा, विवस्वान्‌नामक सूर्याच्या संज्ञा आणि छाया या नांवाच्या दोन स्त्रिया होत्या. त्या दोघी विश्वकर्म्याच्या कन्या होत. त्यांचें वृत्त मीं तुला पूर्वीं सांगितलें आहेच ॥ ८ ॥ त्या विवस्वानाचीच तिसरी वडवा म्हणून एक भार्या होती असें म्हणतात. ह्या तिघींमध्यें संज्ञेला यम, यमुना व श्राद्धदेवमनु हीं तीन अपत्यें झालीं ॥ ९ ॥ सावर्णिनामक पुत्र व पुढें संवरणऋषीची भार्या झालेली तपती नांवाची कन्या आणि तिसरा शनैश्वर हीं तीन छायेचीं अपत्यें होत. अश्विनीकुमार हे वडवेचे पुत्र होत ॥ १० ॥ असो. हे राजा, आठवें मनन्वंतर प्राप्त झालें असतां सावर्णि हा मनु होईल व निर्मोक आणि विरजस्क इत्यादिक त्याचे पुत्र होतील ॥ ११ ॥ तसेंच त्या मन्वन्तरामध्यें सुतपस, विरज व अमृतप्रभ हे देव होतील आणि ज्यानें ह्या सप्तमन्वंतरांत त्रिपादभूमीची याचना करणाऱ्या विष्णूला ही संपूर्ण पृथ्वी अर्पण केली व ज्याला पूर्वीं भगवंतानें बद्ध केलें असतांहि नंतर प्रसन्न होऊन स्वर्गापेक्षांहि अधिक सुखकारक अशा सुतलामध्यें ज्याची स्थापना केली व जो सांप्रत त्या ठिकाणीं इंद्राप्रमाणें ऐश्वर्याचा उपभोग घेत आहे तो विरोचनपुत्र बलि इंद्र होईल. नंतर तो विष्णूच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या त्या इंद्रपदाचा त्याग करून मोक्षसिद्धीला पावेल ॥१२॥ १३ ॥ १४ ॥ त्या मन्वंतरामध्यें गालव, दीप्तिमान्‌, परशुराम, अश्वत्थामा, कृपाचार्य, ऋष्यशृंग व आमचा पिता

भगवान् वेदव्यास हे सप्तर्षि होतील. हे राजा, सांप्रतकालीं ते ऋषि योगप्रभावानें आपापल्या आश्रममंडलामध्यें वास करीत आहेत ॥१५॥१६॥ त्या मन्वंतरामध्यें ईश्वर प्रभु, देवगुह्य-नामक ब्राह्मणाच्या सरस्वतीनामक स्त्रीच्या पोटीं सार्वभौम ह्या नांवानें अवतार धारण करून, सांप्रतच्या पुरंदरनामक इंद्रापासून इंद्रपद हरण करून बलीला देईल ॥१७॥ नंतर हे राजा, देवसावर्णिनामक वरुणाचा पुत्र नववा मनु होईल आणि भूतकेतु व दीप्तकेतु इत्यादि त्याचे पुत्र होतील ॥ १८ ॥ तसेंच त्या मन्वंतरामध्यें पार, मरीचिगर्भ इत्यादिक देव होतील. अद्‌भुत नांवानें प्रसिद्ध असा इंद्र होईल आणि द्युतिमत्प्रभृति म्हणजे द्युतिमान्, सवन, हव्य, वसु, मेधातिथि, ज्योतिष्मान् व सत्य हे त्या काळीं सप्तर्षि होतील ॥ १९ ॥ तसेंच आयुष्मान्नामक पित्यापासून अंबुधारानामक मातेच्या पोटीं ऋषभ नांवानें भगवान् अवतीर्ण होईल व त्यानें वश केलेल्या त्रैलोक्याचा अद्‌भुतनामक इंद्र उपभोग घेईल ॥ २० ॥ नंतर उपश्लोकाचा पुत्र महात्मा ब्रह्मसावर्णि हा दहावा मनु होईल. त्याचे भूरिषेणादिक पुत्र होतील व हविष्मान ज्यामध्यें प्रमुख आहे, असे ऋषि होतील. हे राजा, हविष्मान्, सुकृति, सत्य, जय, मूर्ति, हीं त्या ऋषींचीं नावें होत. या मन्वंतरांत सुवासन आणि विरुद्ध इत्यादिक देव होतील व शंभुनामक इंद्र होईल आणि विश्वस्रष्ट्याच्या घरीं विषूचिनामक स्त्रीच्या पोटीं समर्थ भगवान् विश्वक्सेन ह्या नांवानें आपला अंशावतार धारण करून शंभुनामक इंद्राला साहाय्य करील ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥ नंतर जितेंद्रिय असा धर्मसावर्णिनामक अकरावा मनु होईल व सत्यधर्म इत्यादिक त्याचे दहा पुत्र होतील ॥२४॥ तसेंच विहंगम, कामगम व निर्वाणरुचि हे त्या मन्वंतरामध्यें देव होतील. आणि वैधृतनामक इंद्र होईल. अरुणप्रभृति म्हणजे अरुण, चविष्मान्, वपुष्मान्, अनघ, उरधिष्ण्य, निश्चर व अग्नितेजा असे हे त्या मन्वंतरांतील सप्तर्षि होतील ॥ २५ ॥ त्या मन्वंतरामध्यें आर्यकनामक पित्या-पासून वैधृतानामक मातेच्या पोटीं धर्मसेतु ह्या नांवानें प्रसिद्ध असा अवतार घेऊन श्रीहरि त्रैलोक्याचें पोषण करील. नंतर रुद्रसावर्णि हा बारावा मनु होईल आणि देववान्,उपदेव व देवश्रेष्ठ इत्यादिक त्याचे पुत्र होतील ॥२६॥२७॥ त्या मन्वंतरामध्यें ऋतधामानामक इंद्र होईल, हरितादिक देव होतील आणि तपोमूर्ति, तपस्वी व आग्नीध्रक इत्यादि सप्तर्षि होतील ॥ २८ ॥ या मन्वन्तरांत सत्यसहस्त्रऋषीच्या सूनृता भार्येच्या पोटीं स्वधामानामक अवतार घेऊन श्रीहरि त्या मन्वंतराचें परिपालन करील. त्याच्यानंतर जितेंद्रिय असा देवसावर्णिनामक तेरावा मनु होईल आणि चित्रसेन व विचित्र इत्यादि त्या देवसावर्णीचे पुत्र होतील ॥२९॥ ३० ॥ तसेंच या मन्वंतरांत सुकर्मा व सुत्रामा ह्या नांवांचे देव होतील व दिव-स्पतिनामक इंद्र होईल आणि निर्मोक, तत्त्वदर्शी, निष्कंभ निरुत्सुक, धृतिमान्, अव्यय व

सुतपा हे त्या काळीं सप्तर्षि होतील आणि दिवस्पतिनामक इंद्राला त्रैलोक्याचें राज्य प्राप्त करून देणारा बृहतीनामक मातेच्या पोटीं देवहोत्राचा योगेश्वरनामक पुत्र उत्पन्न होईल ॥ ३१ ॥ ३२ ॥ त्यानंतर इंद्रसावर्णि म्हणून चौदावा मनु होईल आणि उरु, गंभीर-बुद्धि इत्यादिक त्या इंद्रसावर्णिचे पुत्र होतील. तसेंच पवित्र व चाक्षुष ह्या नांवांचे देव या मन्वंतरांत होतील. शुचि नांवाचा इंद्र होईल व अग्नि, बाहु, शुचि, शुद्ध आणि मागध आदि करून सप्तर्षि होतील ॥ ३३ ॥ ३४ ॥ हे राजा, त्या मन्वंतरामध्यें वितानानामक मातेच्या पोटीं सत्रायणाचा पुत्र म्हणून अवतीर्ण झालेला बृहद्भानुनामक श्रीहरि यज्ञकर्माचा विस्तार करील ॥ ३५ ॥ हे राजा, याप्रमाणें भूत, भविष्य व वर्तमान अशा तिन्ही काळीं होणारीं हीं चौदा मन्वंतरें मी तुला सांगितलीं. ह्या चौदाहि मन्वंतरांनीं परिमित झालेला सहस्र-युगप्रमाणाचा जो काळ त्यालाच कल्प असें म्हणतात ॥ ३६ ॥

## तेरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १४ वा

राजा म्हणाला,—हे भगवन्, तुम्हीं जे हे मनु आदिकरून मन्वंतरांतील अधिकारी सांगितले त्या सर्वांची, प्रत्येक मन्वंतरांत कोणी, कोठें व कशी योजना केली तें मला सांगा ॥ १ ॥

शुकाचार्य म्हणाले,— हे राजा, मनु, मनूचे पुत्र, सप्तऋषि, इंद्र व देवगण या सर्वांची भगवंतानेंच त्या त्या कामावर योजना केलेली असते ॥ २ ॥ परमेश्वराच्या ज्या यज्ञादिक अवतारमूर्ति मीं पूर्वीं तुला सांगितल्या, त्यांच्या प्रेरणेनें मनु आदि करून सर्व अधिकारी जगाचा व्यवहार चालवितात ॥ ३ ॥ हे राजा, कालगतीनें वेदांचे समुदाय लुप्त होतात; पण चार युगांचा अवधि संपून पुनः कृतयुगाचा प्रारंभ झाला म्हणजे ते वेद तपोबलामुळें पूर्वीं होते तसे ऋषींना दिसतात आणि मग त्यांपासून लोकांमध्यें सनातन धर्माचा पुनः प्रसार होतो ॥ ४ ॥ हे राजा, नंतर श्रीहरि मनूंना उपदेश करितो आणि तदनुसार मनु, मनोनिग्रह करून आपापल्या मन्वंतरामध्यें पृथ्वीवर चारी पायांनीं युक्त अशा धर्माची योग्य रीतीनें स्थापना करितात ॥ ५ ॥ तसेंच मनुपुत्र देखील पुत्रपौत्रादि क्रमानें यज्ञभाव ग्रहण करणारे जे देव त्यांसह मन्वंतरसमाप्तीपर्यंत लोकांचें व धर्माचें रक्षण करितात ॥ ६ ॥ भगवंतानें दिलेल्या समृद्ध अशा त्रिभुवनाच्या ऐश्वर्याचा उपभोग घेणारा इंद्र पृथ्वीवर यथेष्ट जलवृष्टि करून त्रैलोक्याचें पालन करितो ॥ ७ ॥ हे राजा, प्रत्येक युगामध्यें श्रीहरि सनकादि सिद्धांचें रूप धारण करून ज्ञानाचा, याज्ञवल्क्यप्रभृतिऋषींचें रूप धारण करून कर्ममार्गाचा आणि दत्तात्रेयादिक योगेश्वरांच्या रूपानें योगाचा उपदेश करीत असतो ॥ ८ ॥ तसाच तो मरीचिप्रभृति प्रजापतींच्या रूपानें प्रजोत्पत्ति करितो. राजांच्या रूपानें चोरांचा क्षय करितो व भिन्न प्रकारच्या गुणांनीं युक्त होऊन कालरूपानें तो शेवटीं सर्वांना नाशाला कारण होतो ॥ ९ ॥ नामरूपात्मक मायेच्या योगानें ज्यांचीं अंतःकरणें मोहित झालीं आहेत असे हे लोक नाना प्रकारच्या शास्त्रांनीं त्याचें निरूपण करीत असतात. तथापि त्याचें ज्ञान त्यांना होत नाहीं ॥ १० ॥ हे राजा, अवान्तर कल्पामध्यें चौदा मन्वंतरें होतात, असें प्राचीन विद्याविशारद पुरुष म्हणतात त्याचें हें प्रमाण मीं तुला सांगितलें ॥ ११ ॥

**अध्याय चौदावा समाप्त**

# अध्याय १५ वा

राजा म्हणाला,—हे भगवन्, श्रीहरि सर्वसमर्थ असून त्यानें कृपणाप्रमाणें बलीपासून तीन पावलें भूमि कशाकरितां मागितली, आणि स्वतः पूर्णमनोरथ असतांहि त्यानें त्या बलीला कशाकरितां बांधून टाकिलें हें जाणावयाची आम्हांला इच्छा आहे. कारण यज्ञफलदाता व पूर्णकाम अशा परमेश्वरानें याचना करावी व निरपराधी बलीला बंधन घडावें; ह्या दोन्ही गोष्टी मोठ्या आश्चर्यजनक होत असें आम्हांला वाटतें ॥ १ ॥ २ ॥ शुकाचार्य सांगतात:—हे राजा, बलीची संपत्ति युद्धांत नष्ट झाली व इंद्रानें त्याला मूर्च्छितहि केलें; पण शुक्राचार्यांनीं त्याला पुन: जिवंत केल्यामुळें तो उदारचित्त बलि त्यांचा शिष्य झाला आणि त्यांना इष्ट असलेले पदार्थ समर्पण करून तो त्यांची सेवा करूं लागला ॥ ३ ॥ तेव्हां महाप्रभावशाली अशा त्या भृगुवंशीय ब्राह्मणांनीं संतुष्ट होऊन स्वर्ग जिंकण्याची इच्छा करणाऱ्या त्या बलीला + महाभिषेकविधीनें राज्याचा अभिषेक करून त्याच्याकडून विश्वजित्‌नामक यज्ञ करविला ॥४॥ त्या यज्ञांत होमद्रव्यांनीं पूजिलेल्या अग्नीपासून सुवर्णाच्या पट्ट्यांनीं बांधविलेला रथ, इंद्राच्या घोड्याप्रमाणें हिरव्या वर्णाचे घोडे व सिंहाच्या चित्रानें शोभणारा ध्वज, अशा वस्तु निघाल्या ॥ ५ ॥ तसेंच सुवर्णाचें दिव्य धनुष्य, अक्षय्य भाते व दिव्य कवच हींहि त्या अग्नीपासूनच निघालीं. त्या वेळीं बलीचा आजोबा प्रल्हाद यानें, जिचीं पुष्पें कधींहि म्लान होत नाहींत अशी माळ बलीला दिली व शुक्राचार्यानें शंख दिला ॥६॥ ह्याप्रमाणें ब्राह्मणांनीं त्याची युद्धसामग्री संपादन करून स्वस्तिवाचनादि केलें असतां, त्यानें त्या ब्राह्मणांना प्रदक्षिणापूर्वक नमस्कार केला आणि प्रल्हादालाहि नमस्कार करून त्याची आज्ञा घेतली ॥ ७ ॥ नंतर सर्वोत्कृष्ट माळा, उत्तम कवच, धनुष्य, खड्ग व भाते धारण करून तो महारथी बलि भृगुवंशीय ब्राह्मणांनीं दिलेल्या रथावर आरूढ झाला ॥ ८ ॥ त्या वेळीं सुवर्णाच्या बाहुभूषणांनीं ज्याचे बाहु झळकत आहेत व मकराकार कुंडलें ज्याच्या कानांत तळपत आहेत असा तो रथारूढ झालेला बलि, कुंडामध्यें प्रज्वलित झालेल्या अग्नीप्रमाणें शोभूं लागला ॥ ९ ॥ नंतर जणूं काय आकाश पिऊन टाकीत आहेत व नेत्रांनीं दिशा जाळून टाकीत आहेत अशा प्रभाव, बल व संपत्ति यांनीं समान असलेल्या दैत्यसैन्याच्या अनेक अधिपतींना बरोबर घेऊन तो समर्थ बलि, स्वर्ग व पृथ्वी यांना कंपित करीत प्रचंड सेनेसह अत्यंत समृद्ध अशा इंद्रपुरीकडे अत्यंत वेगानें निघाला ॥१०॥११॥ त्या नगरींत शोभायुक्त अशी नंदनादिक अनेक वनें व उपवनें होतीं. त्या उपवनांत पक्ष्यांचीं जोडपीं मधुर शब्द करीत असून मत्त भ्रमर गुंजारव करीत आणि कोमल पल्लव, फलें व

+ या महाभिषेकविधीला ऐन्द्रविधि असें नांव असून तो ऋग्वेदाच्या ऐतरेय-ब्राह्मणांत वर्णिला आहे.

पुष्पें ह्यांच्या भरानें त्यांतील कल्पवृक्षांच्या शाखा अगदीं लवून गेल्या होत्या. देवांनीं उपभोग घेण्यास योग्य अशा उत्तम स्त्रिया त्यांतील सरोवरांत क्रीडा करीत असत, व हंस, सारस, चक्रवाक व कारंडव ह्यांच्या समूहांनीं तीं सरोवरें भरलेलीं असत. अशा त्या उपवनांच्या योगानें ती नगरी फार रमणीय दिसे ॥ १२ ॥ १३ ॥ त्या नगरीभोंवतीं सर्व देवांना पूज्य अशी आकाशगंगा खंदकाप्रमाणें पसरली होती आणि तिच्या आंत अग्नी-सारखा तेजःपुंज असा उंच व ठिकठिकाणीं बुरूज असलेला तट होता ॥ १४ ॥ तिच्या दरवाज्यांना सोन्याच्या पट्टया लाविल्या असून तिचीं महाद्वारें स्फटिकाचीं होतीं. तींतील निरनिराळे रस्ते अगदीं आंखीव होते. ही नगरी प्रत्यक्ष विश्वकर्म्यानें निर्माण केलेली होती ॥ १५ ॥ तींत अनेक ठिकाणीं सभागृहें, अंगणें व लहान रस्ते असून दहा कोटि विमानें सारखीं लागून राहिलीं होतीं. तिच्यामध्यें हिऱ्यांचे व पोवळ्यांचे ओटे असून तिच्यांतील चव्हाट्यांवरील भूमींत रत्नें बसविलीं होतीं ॥ १६ ॥ त्या नगरींतील स्त्रिया सर्वदा तरुण व सुकुमार असून त्या नित्य निर्मळ वस्त्रें परिधान करून उत्तम प्रकारचे अलंकार धारण करीत. त्या नित्य सोळा वर्षांच्या वयाच्या दिसत असून ज्वालांनीं शोभणाऱ्या अग्नी-प्रमाणें शोभत असत ॥ १७ ॥ त्या रस्त्यांतून वाहणारा वायु त्या देवांगनांच्या केंसांतून गळलेल्या ताज्या चंपक-मालांचा सुवास ग्रहण करून वाहात असे ॥१८॥ त्या नगरींतील रस्ते सुवर्णाच्या जाळ्यांतून बाहेर निघणाऱ्या अगुरुधूमाच्या सुवासिक अशा शुभ्र धुरानें भरलेले असून त्यांवरून देवांच्या प्रिय अप्सरा संचार करीत असत ॥ १९ ॥ रस्त्यांत जिकडे तिकडे मोत्यांचीं छत्रें लाविलीं असून, रत्नजडित सुवर्णध्वज फडकत होते. तिच्या-मधील विमानांच्या आघाडीवर नाना प्रकारच्या पताका लाविलेल्या होत्या. मोर, पारवे व भुंगे ह्यांच्या नादानें ती सारी नगरी दुमदुमून गेली होती आणि देवांगनांच्या मधुर गीतांनीं तिला मंगल स्वरूप आलें होतें ॥ २० ॥ त्या नगरांत अनेक ठिकाणीं मृदंग, शंख, नगारे, टिमक्या इत्यादि वाद्यांचा घोष चालला असून, टाळ, वीणा, डोल्ची, ऋष्टि व वेणु या वाद्यांच्या नादावर गंधर्वादिकांचें नृत्य व गायन होत असल्यामुळें, तिला मनोरमत्व आलें होतें आणि तिनें आपल्या प्रभेनें प्रकाशदेवतेला जिंकिलें आहे असें वाटे ॥ २१ ॥ तिच्यामध्यें पातकी, दुष्ट, प्राण्यांना पीडा देणारे, वंचक, अभिमानी, विषयासक्त व लोभी अशा पुरुषांचा प्रवेश होत नसे. अधर्मादि दोषांनीं रहित अशाच पुरुषांना तींत जातां येत होतें ॥ २२ ॥ अशा त्या देवनिवासभूत नगरीला त्या सेनाधिपति बलीनें बाहेरच्या बाजूनें सभोंवार आपल्या सेनेचा वेढा दिला आणि इंद्राच्या स्त्रियांना भय उत्पन्न करण्याकरितां शुक्राचार्यानें दिलेला महानादयुक्त शंख वाजविला ॥ २३ ॥ तेव्हां बलीचा तो महाप्रयत्न ओळखून इंद्रानें सर्व देवगणांसह गुरूला विचारलें ॥२४॥ हे भगवन्, आपला पूर्ववैरी जो बलि त्यानें चालविलेला हा महान् उद्योग आपल्याला अत्यंत असह्य आहे असें मला वाटतें. याला एवढें बळ कशानें प्राप्त झालें बरें ? ॥ २५ ॥ ह्याचा प्रतिकार करण्यास कोणत्याहि उपायानें कोणीहि समर्थ होणार नाहीं. प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें आमचा नाश करण्याकरितां हा उद्युक्त झाला असून आपल्या तोंडानें तो सारें विश्व पिऊन टाकीत आहे कीं काय,

जिभेनें दाही दिशा चाटीत आहे कीं काय व नेत्रांनीं त्याला जाळून टाकीत आहे कीं काय, असें भासतें ॥ २६ ॥ ह्याला एवढें इंद्रियसामर्थ्य, मानसिक शक्ति, शरीरबल व प्रभाव हीं कोणत्या कारणानें मिळालीं तें सांगा. या सामर्थ्यावरच ह्याचा हा मोठा उद्योग चालला आहे व तो आम्हांला असह्य झाला आहे ॥ २७ ॥

इंद्राचा प्रश्न ऐकून गुरु म्हणाला,–' हे इंद्रा, ह्या तुझ्या शत्रूच्या चढाईचें कारण मीं जाणतों. शिष्य होऊन आपणांला सर्वस्व अर्पण केल्यामुळें, ब्रह्मदेवाच्या भृगुकुलोत्पन्न शुक्राचार्यांनीं हें तेज त्याला दिलें आहे ॥ २८ ॥ जसे कोणीहि लोक मृत्यूसमोर उभे राहण्यास समर्थ होत नाहींत, त्याप्रमाणें एका श्रीहरीवांचून तूं किंवा तुझ्यासारखा दुसरा कोणीहि पुरुष ह्याच्या समोर उभा राहूं शकणार नाहीं ॥ २९ ॥ यास्तव तुम्ही सर्वांनीं सध्यां स्वर्गाचा त्याग करून कोठें गुप्तपणें बसावें आणि तुमच्या या शत्रूचा पराभव होण्याची वेळ येईपर्यंत प्रतीक्षा करीत राहावें ॥ ३० ॥ हे देव हो, ह्या बलीचा ब्राह्मणांच्या बलामुळेंच उत्तरोत्तर उत्कर्ष होत आहे आणि सध्या तर हा अतिशय पराक्रमी झाला आहे; पण हा त्या ब्राह्मणांचाच जेव्हां अपमान करील तेव्हां आपल्या परिवारासह नाश पावेल ॥ ३१ ॥ ह्याप्रमाणें यथार्थ विचार करणाऱ्या गुरूनें त्यांनीं काय करावें हें विचारपूर्वक सांगितलें असतां, ते देव यथेष्ट रूपें धारण करून स्वर्गाचा त्याग करून गुप्तपणें राहूं लागले ॥ ३२ ॥ ह्याप्रमाणें देव गुप्त झाले असतां विरोचनपुत्र बलीनें देवांचें निवासस्थान अशा त्या इंद्रपुरीचें आधिपत्य स्वीकारून सर्व त्रैलोक्य वश केलें ॥ ३३ ॥ ह्याप्रमाणें बलीनें विश्वाला जिंकून आपल्या नियंत्रणाखालीं आणिलें असतां आपल्या आज्ञेंत वागणाऱ्या या शिष्याकडून शिष्यवत्सल अशा त्या भृगुवंशीय ब्राह्मणांनीं शंभर अश्वमेध करविले ॥३४॥ तेव्हां त्या अनुष्ठानाच्या प्रभावानें त्रिभुवनामध्यें पसरलेली आपली कीर्ति दशदिशांना पसरविणारा तो बलि, नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणें शोभूं लागला॥ ३५ ॥ त्याचें अंतःकरण उदार होतें व तो आपणाला कृतकृत्य मानीत ब्राह्मणश्रेष्ठ शुक्राचार्यांनीं प्राप्त करून दिलेल्या विपुल संपत्तीचा उपभोग घेऊं लागला ॥ ३६ ॥

## अध्याय पंधरावा समाप्त

# अध्याय १६ वा

शुक्राचार्य म्हणाले,– हे राजा, ह्याप्रमाणें इंद्रादि पुत्र दिसेनासे झाले व दैत्यांनीं स्वर्गलोक बळकाविला असें पाहून देवमाता अदिति अनाथाप्रमाणें दु:ख करूं लागली ॥ १ ॥ आपली दीर्घकालीन समाधि उतरून भगवान् कश्यपमुनि ती उत्साहरहित, दु:खी असतां, एके दिवशीं तिच्या आश्रमांत आला ॥२॥ तेव्हां हे कुरुश्रेष्ठा, यथायोग्य रीतीनें अदितीनें त्याचें पूजन केलें आणि तिनें दिलेल्या आसनाचा स्वीकार करून कश्यपऋषि, दीनवदन झालेल्या त्या आपल्या पत्नीशीं बोलूं लागला ॥ ३ ॥ तो म्हणाला,– हे भद्रे, सांप्रत आम्हांवर या ठिकाणीं कांहीं आपत्ति ओढवली नाहीं ना ? अथवा, धर्मावर व मृत्यूच्या स्वाधीन असलेल्या लोकांवर कांहीं अनिष्ट तर कोसळलें नाहीं ना ? ॥ ४ ॥ हे गृहस्थाश्रमी स्त्रिये, योगाभ्यास न करणाऱ्या पुरुषांनाहि स्वधर्माचें फळ ज्यांत प्राप्त होतें, अशा गृहस्थाश्रमामध्यें धर्म, अर्थ व काम ह्यांपैकीं एखाद्यावर कांहीं संकट आलें नाहीं ना ? ॥ ५ ॥ किंवा कोणी अतिथि प्राप्त झाले असतां, तूं गृहकार्यांत गुंतलेली असल्यामुळें, पुढें येऊन त्यांचा सत्कार करावयाचा तुझ्याकडून राहिला व ते तसेच घरांतून परत गेले असें तर झालें नाहीं ना ? ॥ ६ ॥ कारण ज्या घरीं आलेल्या अतिथींना पाणीहि न मिळतां परत जावें लागतें, तीं घरें म्हणजे नि:संशय मोठ्या कोल्ह्यांचीं बिळेंच होत ॥ ७ ॥ असो. हे पतिव्रते, हे भद्रे, मी देशांतरास गेलों असतां तूं मनामध्यें उद्विग्न झाल्यामुळें होमकाळीं अग्नीला हविर्भाग द्यावयाचा एखाद्या वेळीं राहिला नाहीं ना ? ॥ ८ ॥ ब्राह्मण व अग्नि यांच्या पूजनानें गृहस्थाश्रमी पुरुष, मनोरथ पूर्ण करणाऱ्या लोकीं गमन करितो, यास्तव ते सर्व देवतांचा आत्मा अशा विष्णूचें मुख होत ॥ ९ ॥ हे मनोनिग्रही स्त्रिये, तुझे सर्व पुत्र खुशाल आहेत ना ? तुझ्या मुखावर म्लानपणा आदिकरून जीं चिन्हें दिसत आहेत त्यावरून तुझें मन अस्वस्थ आहे असें मला वाटतें ॥ १० ॥

पतीचें हें भाषण ऐकून अदितीनें उत्तर दिलें, हे ब्रह्मनिष्ठ मुने, ब्राह्मण, गाई, धर्म व येथील सर्व लोक हे सर्व खुशाल आहेत. हे गृहस्थाश्रमी ऋषे, हें घर खरोखर धर्म, अर्थ व काम ह्या त्रिवर्गांचें मोठें उत्पत्तिस्थान आहे ॥ ११ ॥ हे ब्रह्मज्ञानी मुने, अग्नि, अतिथि, सेवक, संन्यासी व इतरहि द्रव्यादिकांची इच्छा धरून येणारे लोक, या सर्वांचा मी यथायोग्य सत्कार केला आहे. भगवद्रूपी तुमचें प्रतिक्षणीं मी ध्यान करीत असल्यामुळें मला या गोष्टींत कांहीं उणें पडत नाहीं ॥ १२ ॥ तसेंच हे भगवन्, तूं प्रजापति असून मला धर्माचा उपदेश करीत असतां माझा कोणता मनोरथ सिद्धीस जाणार नाहीं बरें ? ॥१३॥ हे प्रभो, सत्त्व, रज व तम ह्या गुणांनीं युक्त असलेल्या ह्या सर्व प्रजा तुझ्याच मनापासून आणि शरीरापासून उत्पन्न झालेल्या आहेत, आणि म्हणून असुरप्रभृति त्या सर्व प्रजांविषयीं तुझी

समदृष्टि आहे. तथापि, ज्याप्रमाणें परमेश्वरहि आपल्या भक्तांकडे विषेश लक्ष देतो, त्याप्रमाणें हे व्रतशाली समर्थ मुने, तुझी नित्य सेवा करीत असलेल्या माझें कल्याण कसें होईल, हें लक्षांत आण आणि हे प्रभो, माझें व माझ्या पुत्रांचें रक्षण कर. कारण शत्रूंनीं त्यांची संपत्ती हरण करून त्यांना स्थानभ्रष्ट केलें आहे ॥१४॥१५॥ शत्रूंनीं मला स्थानभ्रष्ट करून बाहेर घालविल्यामुळें मी दु:खसागरामध्यें बुडून गेलें आहें. प्रबल शत्रूंनीं माझें ऐश्वर्य, संपत्ति यश व स्थान हीं सर्व हरण केलीं आहेत ॥ १६ ॥ यास्तव हे प्रभो, भक्तांचें कल्याण करणारांमध्यें तूं श्रेष्ठ असून त्याचें कार्य साधण्यास समर्थ असल्यामुळें जेणेंकरून माझ्या पुत्रांना त्यांचें पूर्वींचें ऐश्वर्य पुन: प्राप्त होईल, असा कांहीं उपाय मनांत ठरवून त्यांचें कल्याण कर ॥ १७ ॥

शुकाचार्य म्हणाले, —हे राजा, याप्रमाणें अदितीनें प्रार्थना केली असतां कश्यप-प्रजापति म्हणाला—काय हो विष्णूच्या मायेचा पराक्रम ! तिनें हें सारें जग स्नेहपाशानें कसें बद्ध करून टाकिलें आहे ! ॥१८॥ अहो, पंचमहाभूतांपासून झालेला आत्मस्वरूपाहून भिन्न असा देह कोणीकडे आणि प्रकृतीहून निराळा असा आत्मा कोणीकडे ? पति, पुत्र इत्यादि खरें पाहूं गेलें असतां कोणाचे कोण आहेत बरें ? मोहामुळें हे संबंध उत्पन्न झाले आहेत ॥ १९ ॥ यास्तव हे अदिते, षड्गुणैश्वर्यसंपन्न, परिपूर्ण, मायानिवर्तक व सर्व प्राण्यांच्या अंत:करणामध्यें वास करणारा असा जो जगद्गुरु वासुदेव त्याचें तूं आराधन कर, म्हणजे तो दीनदयाळ श्रीहरि तुझे मनोरथ पूर्ण करील. कारण हे अदिते, भगवंताची भक्ती केली असतां ती मात्र सफल होते, इतरांची तशी होत नाहीं, अशी माझी खात्री आहे ॥ २० ॥ २१ ॥

अदिति म्हणाली,—हे ब्रह्मन्, विश्वपालक भगवंताचे मीं कोणत्या प्रकारें भजन करावें, म्हणजे तो सत्कसंकल्प भगवान् माझा मनोरथ पूर्ण करील ? ॥ २२ ॥ हे द्विजश्रेष्ठा, पुत्रांसह क्लेश भोगणाऱ्या मजवर, तो देव जेणेंकरून सत्वर संतुष्ट होईल असा त्याच्या सेवेचा प्रकार तूं मला कथन कर ॥ २३ ॥

कश्यप म्हणाला,— हे भद्रे, प्रजाप्राप्तीच्या इच्छेनें मीं पूर्वीं भगवान् ब्रह्मदेवाला हाच प्रश्न केला होता. तेव्हां त्यानें मला जें सांगितलें, तेंच भगवंताला संतुष्ट करणारें व्रत मी तुला कथन करितों ॥ २४ ॥ हे अदिते, फाल्गुन महिन्याच्या शुक्लपक्षामध्यें प्रतिपदेपासून द्वादशीपर्यंत बारा दिवस केवळ दूध प्राशन करून मनुष्यानें भक्तियुक्त अंत:करणानें कमलनयन भगवंताचें पूजन करावें ॥ २५ ॥ प्रथम अमावास्येच्या दिवशीं

मिळाल्यास रानडुकरानें उकरलेली माती घेऊन नदीच्या प्रवाहामध्यें उभें राहावें, आणि 'देवि, प्राण्यांना निवासस्थान प्राप्त व्हावें या इच्छेनें भगवंतानें वराहावतार धारण करून रसातलापासून तुझा उद्धार केला, तुला नमस्कार असो. तूं माझ्या पातकाचा नाश कर' असा मंत्र म्हणून ती मृत्तिका शरिराला लावून स्नान करावें ॥ २६ ॥ २७ ॥ नंतर नित्यनैमित्तिक कृत्य आटोपून प्रतिमा, स्थंडिल, सूर्य, जल, अग्नि अथवा गुरु ह्यांपैकीं कोणत्या तरी ठिकाणीं स्वस्थांत:करणपूर्वक देवांचें अर्चन करावें ॥ २८ ॥ ( हें अर्चन करतांना पुढील मंत्र म्हणावेत ) हे भगवंता, हे पुरुषोत्तमा, ब्रह्मादिकांना पूज्य, सर्व भूतांचें निवासस्थान व सर्वसाक्षी अशा तुज वासुदेवाला नमस्कार असो ॥ २९ ॥ अव्यक्त, अतिसूक्ष्म, प्रकृतिपुरुषरूप, चोवीस तत्त्वांचा ज्ञाता आणि सांख्यशास्त्रप्रवर्तक अशा तुज भगवंताला नमस्कार असो ॥ ३० ॥ प्रापणीय व उदयनीय ह्या नांवाचीं जीं यज्ञांतील दोन कर्मे तीं ज्याचीं दोन मस्तकें आहेत, प्रात:सवन, माध्याह्नसवन व तृतीयसवन ह्या तीन पायांनीं जो युक्त आहे, ज्याला वेदरूप चार शिंगें आहेत, जो फळविस्तारक आहे, गायत्र्यादिक सात छंद हे ज्याचे सात हात आहेत व मंत्रब्राह्मणकल्परूप त्रयी विद्या हें ज्याचें स्वरूप आहे, त्या तुजे यज्ञमूर्तीला नमस्कार असो ॥ ३१ ॥ सर्व भूतांचा व सर्व विद्यांचा अधिपति, सर्वशक्तिधर आणि परमानंदस्वरूप अशा तुज रुद्रमूर्तीला नमस्कार असो ॥ ३२ ॥हिरण्यगर्भ, सूत्ररूप, जगदात्मा, योगैश्वर्य शरिरानें युक्त व योगप्रवर्तक अशा तुज ब्रह्ममूर्तीला नमस्कार असो ॥ ३३ ॥ सर्व जगताला पूज्य, सर्वसाक्षीभूत आणि दु:खनिवर्तक अशा तुज नरनारायणरूप ऋषिरूपी हरीला नमस्कार असो ॥ ३४ ॥ ज्याचें शरीर पाचेप्रमाणें श्यामवर्ण आहे व ज्याच्या ठिकाणीं लक्ष्मीनें आश्रय केला आहे, त्या तुज पीतांबरधारी केशवाला नमस्कार असो ॥ ३५ ॥ हे नरश्रेष्ठा, हे सर्वोत्तमा, तूं पुरुषांना सर्व प्रकारचे वर देणारा असल्यामुळें विवेकी लोक आपल्या मनोरथांची सिद्धि होण्याकरितां तुझ्या चरणरजांचें सेवन करितात ॥ ३६ ॥ चरणकमलांचा परिमल सेवन करण्याच्या इच्छेनेंच जणूं काय देव व लक्ष्मी ज्याची सेवा करितात, तो भगवान् मजवर प्रसन्न होवो ॥ ३७ ॥ अशा ह्या नऊ मंत्रांनीं ध्यान करून आवाहनमुद्रेनें पुढें असलेल्या प्रतिमेच्या ठिकाणीं स्थिर केलेल्या भगवंताचें, पाद्य, आचमन इत्यादि उपचारांनीं श्रद्धापूर्वक पूजन करावें ॥ ३८ ॥ नंतर गंधपुष्पादिक उपचारांनीं पूर्वपूजा करून प्रभूला दुधाचा अभिषेक करावा; आणि मग वस्त्रें, यज्ञोपवीतें, भूषणें, पाद्य, आचमन, गंध व धूप इत्या दि उपचारांनीं द्वादशाक्षरमंत्रानें पूजन करावें ॥ ३९ ॥ सामर्थ्य असल्यास दुधामध्यें शिजविलेल्या आणि तूप व गूळ ह्यांनीं मिश्र केलेल्या भाताचा नैवेद्य दाखवून द्वादशाक्षरी मूलमंत्रानें त्याच शाल्योदनाचा होम करावा ॥ ४० ॥ नैवेद्य म्हणून केलेलें तें अन्न भगवद्भक्ताला द्यावें किंवा आपण भक्षण करावें.ह्याप्रमाणें पूजा व नैवेद्य झाल्यानंतर प्रभूला आचमन देऊन तांबूल समर्पण करावा ॥ ४१ ॥ मग 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या मूलमंत्राचा एकशें आठ वेळां जप करून पूर्वोक्त व इतर स्तुतींनीं प्रभूचें स्तवन करावें आणि प्रदक्षिणा करून आनंदानें भूमीवर साष्टांग नमस्कार घालावा ॥ ४२ ॥

नंतर निर्माल्य मस्तकीं धारण करून मूर्तीचें विसर्जन करावें आणि निदान दोन तरी ब्राह्मणांस खिरीचें यथोचित भोजन घालावें ॥ ४३ ॥ नंतर दक्षिणादि देऊन सत्कार केलेल्या त्या ब्राह्मणांची आज्ञा घेऊन अवशिष्ट राहिलेल्या अन्नाचें बंधूंसह आपण भोजन करावें आणि त्या रात्रीं ब्रह्मचर्यव्रतानें राहून दुसरे दिवशीं प्रतिपदेला प्रभातकालीं स्नान करून शुचिर्भूत व्हावें आणि स्वस्थ अंतःकरणपूर्वक दुधाचा अभिषेक करून, पूर्वी सांगितलेल्या विधीनें भगवंताचें पूजन करावें. हा क्रम व्रतसमाप्तीपर्यंत चालवावा ॥ ४४ ॥ ४५ ॥ ह्याप्रमाणें दुधावर राहून व विष्णुपूजेविषयीं आदर धरून पुरुषानें हें व्रत करावें आणि प्रतिदिवशीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें द्वादशाक्षरी मंत्रानें अग्नीमध्यें हवन करून ब्राह्मणांनाहि भोजन घालावें ॥ ४६ ॥ बारा दिवसपर्यंत केवळ दुधाचें सेवन करून, हवन, पूजन व ब्राह्मणभोजन अशीं ज्यांत आहेत असें हें श्रीहरीला संतोष देणारें व्रत आचरावें ॥ ४७ ॥ हे अदिते, हें व्रत करणाऱ्यानें प्रतिपदेपासून तों शुक्लत्रयोदशीपर्यंत ब्रह्मचर्य, जमिनीवर निजणें आणि त्रिकाल स्नान हे नियम पाळले पाहिजेत ॥ ४८ ॥ तसेंच असत्य भाषण, लहानमोठे भोग व कोणत्याहि प्राण्याची हिंसा हीं वर्ज करून भगवान् वासुदेवाच्या ध्यानांत नित्य निमग्न असावें ॥ ४९ ॥ नंतर त्रयोदशीच्या दिवशीं सर्व विधि जाणणाऱ्या ब्राह्मणाकडून शास्त्रोक्त रीतीनें भगवान् विष्णूला पंचामृतांनीं स्नान घालावें ॥ ५० ॥ नंतर द्रव्याचा लोभ न करिता महापूजा करून अंतर्यामी अशा शिपिविष्टसंज्ञक विष्णूच्या उद्देशानें दुधामध्यें भात शिजवून त्या सिद्ध झालेल्या पक्व चरूनें भगवंताचें एकाग्रमनानें यजन करावें आणि त्या परमात्म्याला संतोषकारक असा सर्वोत्कृष्ट महानैवेद्य अर्पण करावा ॥ ५१ ॥ ५२ ॥ मग ज्ञानसंपन्न अशा आचार्याला आणि ऋत्विजांना वस्त्रें, भूषणें व धेनु हीं देऊन संतुष्ट करणें म्हणजेच श्रीहरीला प्रसन्न करणें होय असें तूं समज ॥ ५३ ॥ हे सुंदरि, त्या आचार्यादिकांना, इतर ब्राह्मणांना व दुसरेहि जे कोणी तेथें आले असतील त्यांनाहि यथाशक्ति माधुर्यादिगुणयुक्त अशा उत्तम अन्नाचें भोजन घालावें ॥ ५४ ॥ आचार्य व ऋत्विज् यांना यथायोग्य दक्षिणा द्यावी आणि चांडाळापासून जे कोणी तेथें आले असतील त्या सर्वांना अन्न देऊन तृप्त करावें॥५५॥दीन, अंध, दरिद्री या सर्वांनीं भोजन केलें असतां तें विष्णूचा संतोष करणारें आहे असें जाणून बंधुजनांसह स्वतः भोजन करावें ॥ ५६ ॥ याप्रमाणें प्रतिपदेपासून त्रयोदशीपर्यंत नृत्य, वाद्य, गीत, स्वस्तिवाचन, स्तुति व भगवत्कथा ह्यांच्या योगानें प्रत्यहीं भगवंताचें पूजन करावें ॥ ५७ ॥ अशा प्रकारें सर्वोत्कृष्ट असें पयोव्रत परमेश्वराला प्रसन्न करणारें असून ब्रह्मदेवानें तें मला सांगितलें व तेंच आतां मीं तुला उत्तम प्रकारें सांगितलें आहे ॥ ५८ ॥ हे भाग्यशाली स्त्रिये, शुद्ध भावानें युक्त अशा

चित्तानें इंद्रियांचें दमन करून उत्तम प्रकारें या व्रताचें आचरण कर आणि तेणेंकरून अविनाशी अशा भगवंताची सेवा कर ॥ ५९ ॥ हे भद्रे, ह्या व्रताच्या योगानें ईश्वर संतुष्ट होत असल्यामुळें ह्या अनुष्ठालाच सर्वयज्ञ असें नांव आहे; ह्याला सर्वव्रत असेंहि म्हणतात. तपाचें सार काय तें हेंच असून उत्तम दानहि हेंच होय ॥ ६० ॥ कारण, ज्याच्यायोगानें अधोक्षज भगवान् संतुष्ट होतो, तेंच सर्वोत्कृष्ट दान, तेंच सर्वोत्कृष्ट व्रत, तोच सर्वोत्कृष्ट यम होय ॥ ६१ ॥ यास्तव हे भद्रे, प्रयत्नपुरःसर श्रद्धेनें तूं ह्या व्रताचें आचरण कर, म्हणजे भगवान् संतुष्ट होऊन तुझे मनोरथ पूर्ण करील ॥ ६२ ॥

**अध्याय सोळावा समाप्त**

---

# अध्याय १७ वा

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, याप्रमाणें आपला भर्ता जो कश्यप त्यानें उपदेश केला असतां अदितीनें आलस्यरहित होऊन बारा दिवसपर्यंत हें व्रत आचरण केलें ॥ १ ॥ बुद्धीला मार्गदर्शक आणि इंद्रियरूप द्वाड घोड्यांना मनोरूपी लगामानें आवरून एकनिष्ठ बुद्धीनें पुरुषश्रेष्ठ ईश्वराचें ती सतत पूजन करीत होती. अशा रीतीनें एकाग्रबुद्धीनें विश्व-स्वरूपी भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं आपलें मन स्थिर करून तिनें पयोव्रताचें अनुष्ठान केलें ॥२॥ ३॥ बा परीक्षित्राजा, ह्याप्रमाणें ती व्रतानुष्ठान करीत असतां त्या व्रताच्या प्रभावानें शंख, चक्र व गदा हीं आयुधें धारण करणारा, चतुर्भुज, पीतांबरधारी असा भगवान् तिच्या समोर प्रगट झाला ॥ ४ ॥ डोळ्यांनीं दिसणाऱ्या त्या भगवंताला पाहताक्षणींच तिचें अंतःकरण त्याच्याविषयींच्या भक्तीनें गहिंवरून गेलें आणि तिनें लगेच उठून आदरपूर्वक त्याला भूमीवर साष्टांग नमस्कार घातला ॥ ५ ॥ तिचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून गेले, तिच्या देहावर रोमांच उभे राहिले व त्याच्या दर्शनानें तिला अत्यंत आनंद झाल्यामुळें तिच्या शरिराला कंप सुटला. भूमीवरून उठून ती परमेश्वराची स्तुति करूं लागली; पण प्रेमानें गहिं-वरून गेल्यामुळें तिच्या तोंडांतून शब्द निघेना व ती केवळ हात जोडून उभी राहिली ॥६॥ पण नंतर हे कुरुश्रेष्ठा, तिनें हळूहळू सद्गदित शब्दांनीं श्रीहरीचें प्रेमपूर्वक स्तवन केलें. त्या वेळीं ती अदितिदेवी, त्या यज्ञाधिपति जगत्पालक रमाकांत श्रीहरीला नेत्रांनी पिऊनच टाकीत आहे कीं काय अशा रीतीनें त्याजकडे टक लावून पाहात होती ॥ ७ ॥ अदिति म्हणाली,— हे यज्ञफलदात्या, हे यज्ञपुरुषा, हे अच्युता, तुझें चरित्र किती पवित्र आहे ! हे पवित्रकीर्ते, श्रवणमात्रानेंच तुझें नांव सर्वांचें मंगल करतें. हे आदिपुरुषा, शरणागत जनांच्या दुःखनिवृत्तीकरितांच तूं प्रकट होतोस. हे भगवंता, तूं आमचें कल्याण कर; कारण तूं दीनांचा नाथ आहेस ॥ ८ ॥ तूं विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय करण्याकरितां स्वेच्छेनें माया-गुणांचा स्वीकार करितोस; निरंतर प्रकट असलेल्या पूर्ण ज्ञानानें तूं सर्वदा आपल्या ठिकाणीं असलेल्या मयारूप अज्ञानाचें निरसन करितोस; आत्मरूपापासून कधीं च्युत होत नाहींस; अशा तुज महात्म्या विश्वस्वरूपी श्रीहरीला नमस्कार असो ॥ ९ ॥ हे अनंता, तुझा संतोष झाला असतां तुजपासून मानवांना ब्रह्मदेवासारखे दीर्घायुष्य, इच्छित देह, अनुपम संपत्ति, स्वर्ग, भूमि, रसातल, अणिमादि सर्व योगसिद्धि, धर्म, अर्थ व काम तसेंच मोक्षसाधनभूत ज्ञान हीं सर्वच प्राप्त होतात; मग शत्रूंवर जय मिळविणें इत्यादि त्यांचे मनोरथ परिपूर्ण होतील हें सांगावयास नकोच ॥ १० ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे भरतकुलोत्पन्न परीक्षित्राजा, याप्रमाणें अदितीनें स्तुति केली असतां सर्व भूतांचा अंतर्यामी असा तो कमलनयन भगवान् तिच्याशीं बोलूं लागला ॥ ११ ॥

भगवान् म्हणाला,— हे देवमाते, शत्रूंनीं संपत्ति हरण करून स्वस्थानापासून भ्रष्ट केलेल्या तुझ्या पुत्रांना जें कांहीं मिळावें अशी तुझी बहुत कालपर्यंत अपेक्षा आहे ती मीं जाणिली आहे ॥ १२॥ हे भद्रे, त्या उन्मत्त असुरश्रेष्ठांना समरांगणांत तुझ्या पुत्रांनी पूर्णपणें जिंकावें आणि पुनरपि जय व संपत्ति प्राप्त करून घ्यावी व मग त्यांसह तुला एकत्र राहण्यास मिळावें, अशी तूं इच्छा करीत आहेस ॥१३॥ हे वीरमाते, ज्यामध्यें इंद्र वडील आहे अशा आपल्या पुत्रांनीं युद्धांत शत्रूचा वध करावा आणि त्या शत्रूच्या स्त्रिया दुःखानें आपल्या भर्त्याजवळ जाऊन रडत असलेल्या तूं पाहाव्यास अशीहि तुझी इच्छा आहे ॥ १४ ॥ तसेंच शत्रूंना जिंकून व त्यांपासून कीर्ति व संपत्ति परत मिळवून अत्यंत समृद्ध झालेल्या व स्वर्गावर येऊन क्रीडा करणाऱ्या आपल्या पुत्रांना पाहावेंस असें तुझ्या मनांत आहे ॥ १५ ॥ परंतु हे देवि, सांप्रत ते असुरसेनापति प्रायः अजिंक्य आहेत असें मला वाटतें. अनुकूल व समर्थ असे ब्राह्मण त्यांचें रक्षण करीत असल्यामुळें या वेळीं त्यांचा पराभव करण्यासाठीं प्रयत्न केल्यास तो सुखकारक होणार नाहीं ॥ १६ ॥ तथापि हे देवि, ज्या अर्थीं तूं मला व्रताचरणानें संतुष्ट केलें आहेस, त्या अर्थीं मला कांहीं तरी उपाय योजिणें अवश्यच आहे. कारण माझें पूजन इच्छेनुरूप फल देणारें असल्यामुळें तें व्यर्थ जाणें शक्य नाहीं ॥ १७ ॥ तूं तर आपल्या पुत्रांच्या रक्षणाकरितां पयोव्रतानें माझें यथोचित पूजन व उत्तम प्रकारें स्तवनहि केलें आहेस. यास्तव कश्यपाच्या तपापासून झालेल्या तेजामध्यें प्रवेश करून मी आपल्या अंशानें तुझा पुत्र होईन आणि तुझ्या सर्व पुत्रांचें रक्षण करीन ॥ १८ ॥ ह्यास्तव हे भद्रे, पतीच्या ठिकाणीं तेजोरूपानें मी राहिलों आहें अशी भावना करून पवित्र अशा आपल्या पतीची तूं सेवा कर ॥ १९ ॥ तुला जरी कोणी विचारिलें तरी ही गोष्ट तूं कोणालाहि व कशाहि प्रकारें सांगूं नकोस; कारण, हे देवि, देवांचें सर्व रहस्य उत्तम रीतीनें गुप्त राखिलें तरच तें सिद्धीला मिळवूं शकतें ॥ २० ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, इतकें सांगून भगवान् त्याच ठिकाणीं गुप्त झाला. तेव्हां प्रभु श्रीहरीचा दुर्लभ असा अवतार आपल्या पोटीं होणार असें जाणून स्वतःला कृतकृत्य मानणारी ती अदिति परम प्रेमानें पतीची सेवा करूं लागली ॥ २१ ॥ इकडे अशा त्या कश्यपानेंहि आपल्या ठिकाणीं श्रीहरीचा अंश प्रविष्ट झाला आहे असें समाधीच्या योगानें जाणिलें ॥ २२ ॥ नंतर हे राजा, ज्याप्रमाणें वायु सर्वत्र सारखा असूनहि काष्ठामध्यें घर्षणाच्या योगानें वनाला जाळणाऱ्या अग्नीची स्थापना करितो, त्याप्रमाणें स्वस्थ अंतःकरणानें युक्त अशा कश्यपानें, स्वतः सर्व पुत्रांविषयीं समदृष्टि धारण केली असूनहि तपाच्या योगानें बहुत कालपर्यंत धारण केलेलें दैत्यनाशक वीर्य अदितीच्या ठिकाणीं स्थापन केलें ॥ २३ ॥ तेव्हां सनातन भगवान् अदितीच्या गर्भाचा आश्रय करून राहिला आहे असें जाणून, ब्रह्मदेवानें विशेष गुण दर्शविणाऱ्या अशा गुह्य नांवांनीं उत्तम प्रकारें त्याची स्तुति केली ॥ २४ ॥

ब्रह्मदेव म्हणाला,—हे महाकीर्तिमान उरुक्रमा भगवंता, तुझा जयजयकार असो. तूं ब्राह्मणांचें हित करणारा असून नाना प्रकारची क्रीडा करणारा आहेस. तीन्ही गुणांचें

नियंत्रण करणाऱ्या तुज भगवंताला वारंवार नमस्कार असो ॥ २५ ॥ तूं पृश्निपुत्र * असून वेदांवरून तुझें ज्ञान होतें, तूं आपल्या नाभीच्या ठिकाणीं त्रैलोक्य धारण करणारा असून सर्वांचा उत्पत्तिकर्ता त्रैलोक्याच्या पृष्ठभागीं वैकुंठामध्यें राहाणारा आहेस. अंतर्यामी मिरूपानें तूंच जीवामध्यें प्रविष्ट झालेला असून सर्वव्यापी आहेस. तुला नमस्कार असो ॥ २६ ॥ हे ईश्वरा, जगताचा आदि, अंत व मध्य तूंच असल्यामुळें तुला अनंतशक्तियुक्त पुरुष ' असें म्हणतात. उदकाचा मोठा प्रवाह आपल्यामध्यें पडलेलें गवत आदिकरून वाहून नेतो, त्याप्रमाणें कालस्वरूपी तूं प्रलयकाळीं हें सर्व विश्व आकर्षण करितोस ॥ २७ ॥ हे देवा, स्थावरजंगमात्मक प्रजा आणि प्रजापति ह्यांना उत्पन्न करणारा तूंच आहेस. उदकामध्यें बुडत असलेल्या लोकांना जशी नांव तसा स्वर्गापासून च्युत झालेल्या देवांचा सर्वोत्कृष्ट आधार तूंच आहेस ॥ २८ ॥

* अदितीचें पूर्वजन्मींचें नांव पृश्नि असें होतें; ( श्रीधर ).

**अध्याय सतरावा समाप्त**

---

# अध्याय १८ वा

शुक्राचार्य म्हणाले,– ' हे राजा, याप्रमाणें ब्रह्मदेवानें श्रीहरीच्या कर्मांची व प्रभावाची प्रशंसा केली असतां, जन्ममरणशून्य, शंख, चक्र, गदा व पद्म हीं आयुधें धारण करणारा, पीतांबरधारी चतुर्भुज आणि कमळाप्रमाणें सुंदर व दीर्घ ज्याचे नेत्र आहेत असा तो श्रीहरि अदितीच्या ठिकाणीं प्रकट झाला ॥ १ ॥ तो पुरुषोत्तम श्यामवर्ण असून निर्मळ होता; मकराकार कुंडलांच्या प्रभेनें त्याच्या मुखकमळावर उत्तम शोभा आली होती; त्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सलांछन प्रकाशत होतें; त्यानें कडीं, तोडे व बाहुभूषणें घातलीं असून उज्ज्वल किरीट, कमरपट्टा व सर्वोत्कृष्ट नूपुरें धारण केलीं होतीं ॥ २ ॥ भ्रमर-समूहाच्या गुंजारवानें निनादित झालेली सुंदर वनमाला त्यांच्या गळ्यांत लटकत होती व त्यानें आपल्या कंठामध्यें कौस्तुभमणि धारण केला होता. तो प्रकट होण्याबरोबर त्याच्या कांतीमुळें प्रजापति कश्यपाच्या घरांतील सर्व अंधकार एकाएकीं नष्ट झाला ॥ ३ ॥ त्या वेळीं सर्व दिशा प्रसन्न झाल्या, सरोवरांतील उदकें स्वच्छ झालीं, सर्व लोक हर्षित झाले, ऋतु आपापल्या पुष्पफलादि गुणांनीं युक्त झाले व स्वर्गलोक, अंतरिक्षलोक, भूलोक, देव, गाई, ब्राह्मण आणि पर्वत हे सर्व आनंदित झाले ॥ ४ ॥ हे राजा, श्रवणनक्षत्रांत चंद्र असतांना श्रवणद्वादशीला अभिजित् मुहूर्तावर हा प्रभूचा अवतार झाला आणि अश्विन्यादि नक्षत्रें आणि गुरु, शुक्र, सूर्य, चंद्र इत्यादि ग्रह ह्या सर्वांनीं त्याचा जन्मकाळ शुभावह केला ॥ १५ ॥ हे राजा, ज्या द्वादशीला श्रीहरीचा अवतार झाला. तिला विजयाद्वादशी असें म्हणतात. त्या दिवशीं त्याच्या जन्माच्या वेळीं सूर्य मध्यान्हीं होता ॥ ६ ॥ प्रभूचा जन्म होतांच शंख, दुंदुभि, मृदंग, पणव व आनक हीं वाद्यें वाजूं लागलीं. तसेंच चौघडा, डंका इत्यादि वाद्यांचा तुमुल नाद होऊं लागला ॥ ७ ॥ अप्सरा आनंदित होऊन नृत्य करूं लागल्या, गंधर्वश्रेष्ठ गायन करूं लागले. मुनि स्तुति करूं लागले, आणि देव, मनु, पितर, अग्नि, सिद्धांचे व विद्याधरांचे गण, किंपुरुष, किन्नर, चारण, यक्ष, राक्षस, गरुडपक्षी, उत्तम भुजंग व देवांचे अनुयायी हे सर्वजण गात, प्रशंसा करीत व नाचत अदितीच्या आश्रमावर पुष्पांचा वर्षाव करूं लागले ॥ ८ ॥ ९ ॥ १० ॥ आपल्या गर्भापासून उत्पन्न झालेल्या त्या पुरुषोत्तमाला अवलोकन करून अदितीला विस्मय वाटला व तिचें हृदय आनंदानें भरून गेलें. आपल्या योगमायेनें देहाचा स्वीकार केलेल्या त्या भगवंताला पाहून प्रजापति कश्यपहि विस्मित झाला आणि त्यानें त्याला ' विजयी हो ! ' असा आशीर्वाद दिला ॥ ११ ॥ हे राजा, श्रीहरि स्वतः अव्यक्त व चैतन्यस्वरूपी असतांहि, कांति, भूषणें व आयुधें ह्यांच्या योगानें व्यक्त भासणारें शरीर त्यानें धारण केलें होतें, त्याच रूपानें तो अद्भुत लीलाधारी श्रीहरि मातापितरांच्या समक्ष वामनरूप घेता झाला ॥ १२ ॥

बटुस्वरूप धारण केलेल्या त्या भगवंताला पाहून आनंदित झालेल्या महर्षींनीं प्रजापति कश्यपाकडून त्याचे जातकर्मादि संस्कार करविले ।। १३ ।। नंतर उपनयन झालें त्या वेळीं प्रत्यक्ष सूर्यानें त्याला गायत्रीमंत्राचा उपदेश केला, बृहस्पतीनें यज्ञोपवीत दिलें व कश्यपानें कटिसूत्र अर्पण केलें ।। १४ ।। तसेंच भूमीनें त्याला कृष्णाजिन दिलें, वनादिपति चंद्रानें दंड दिला, अदितिमातेनें आच्छादनासाठी लंगोटी दिली आणि स्वर्गाभिमानी देवतेनें त्या जगत्पालक वामनाला छत्र अर्पण केलें ।। १५ ।। ब्रह्मदेवानें, त्याला कमंडलु दिला व सप्तर्षींनीं कुश दिले आणि हे महाराजा, सरस्वतीनें त्यास अविनाशी वनमाला रुद्राक्षमाळा समर्पण केली ।। १६ ।। ह्याप्रमाणें उपनयन झालेल्या त्या वामनाला कुबेरानें भिक्षापात्र दिलें आणि साक्षात् षड्गुणैश्वर्यसंपन्न जगन्माता अशी जी पतिव्रता उमादेवी तिनें त्याला भिक्षा अर्पण केली ।।१७।। असो. ह्याप्रमाणें सत्कारिलेला तो श्रेष्ठ बटु ब्रह्मर्षिगणांनीं युक्त अशा त्या सभेमध्यें आपल्या तेजानें अधिकच शोभूं लागला ।। १८ ।। मग ब्राह्मणरूपी भगवान् वामनानें अग्नि सिद्ध करून तो प्रज्वलित केला असतां त्याच्याभोंवतीं तीन वेळ पाणी फिरवून परिसमूहण केलें आणि दर्भाची त्याच्याभोंवतीं परिस्तरणें घालून त्यानें त्याची पूजा केली व समिधांचा त्यामध्यें होम केला ।। १९ ।। हे राजा, एवढें होत आहे तों, भृगुवंशीय ब्राह्मणांनीं चालविलेल्या अश्वमेधांनीं बलिराजा ईश्वराचें पूजन करीत असून तो मोठा सामर्थ्यवान् झाला आहे असें वर्तमान त्याच्या कानीं आलें आणि सर्व बलानें युक्त असा तो भगवान् वामन पदोपदीं आपल्या भारानें पृथ्वीला वांकवीत तेथून निघून त्या बलीच्या यज्ञस्थानाजवळ गेला ।।२०।। नर्मदेच्या उत्तर तटाकीं भृगुकच्छ नांवाच्या क्षेत्रामध्यें बलीचा तो उत्तम प्रकारचा यज्ञ चालला होता. त्याचें अनुष्ठान करणाऱ्या भृगुवंशीय ऋत्विजांनीं त्या वामनाला पाहिल्याबरोबर आपल्याजवळ प्रत्यक्ष सूर्यच उदयास आला आहे कीं काय असें त्यांना वाटलें ।। २१।। हे राजा, वामनाच्या तेजानें ते सारे ऋत्विज निस्तेज झाले आणि यज्ञकर्म पाहाण्यासाठीं आलेला हा खरोखर सूर्य आहे कीं अग्नि आहे कीं सनत्कुमार आहे असा बलि आणि तेथील सर्व सभासद तर्क करूं लागले ।।२२।। ह्याप्रमाणें ते भृगुवंशीय ब्राह्मण आणि त्यांचे शिष्य यांमध्यें वामनाविषयीं नाना प्रकारचे तर्क चालले असतां, दंड, छत्र व जलपूर्ण कमंडलु धारण केलेल्या त्या भगवान् वामनानें अश्वमेधयज्ञाच्या मंडपामध्यें प्रवेश केला ।। २३ ।। त्यानें तृणाची मेखला कमरेंत घातली होती व हरणाचें कातडें त्यानें यज्ञोपवीताप्रमाणें आपल्या उजव्या खांकेखालून धारण केलें होतें. मायेच्या योगानें त्यानें ब्रह्मचारीरूप घेतलें असून जटाहि धारण केल्या होत्या. असा तो भगवान् वामन यज्ञमंडपांत आलेला पाहून त्याच्या तेजानें ते भृगुब्राह्मण आणि त्याचे शिष्य दिपून गेले आणि अग्नीसह त्यांनीं त्याला उत्थापन देऊन त्याचा सत्कार केला ।। २४ ।। २५ ।। त्याच्या सुंदर व मनोहर रूपाला योग्य असेच त्याचे सारे अवयव होते. त्याला पाहून यज्ञकर्त्या बलीला फार आनंद झाला आणि त्यानें त्याला बसावयास आसन दिलें ।। २६ ।। 'महाराज, यावें' असें म्हणून त्यानें वामनाचें स्वागतपूर्वक अभिनंदन केलें व वैराग्यशील पुरुषांच्या मनाला आनंद

होणाऱ्या त्या भगवंताचे पाय धुऊन त्याचें पूजनहि केलें ।। २७ ।। मग लोकांच्या पापांचा नाश करणारें व अत्यंत मंगलकारक असें तें भगवंताचें पाय धुतलेलें पाणी धर्मवेत्त्या बलीनें तीर्थ म्हणून मस्तकीं धारण केलें. कारण देवाधिदेव ब्रह्मदेव आणि चंद्राला मस्तकावर धारण करणारा शंकर यांनींहि परमप्रेमानें तसलें उदक मस्तकीं धारण केलें आहे ।।२८।। याप्रमाणें वामनाची पूजा केल्यावर बलिराजा त्याला म्हणाला,–' हे ब्राह्मणा, तुझें स्वागत असो. तुला मी नमस्कार करतों. तुझें काय कार्य आम्हीं करावें हें सांग. हे श्रेष्ठ द्विजा, तूं ब्रह्मर्षींचें साक्षात् मूर्तिमंत तपच आहेस असें मी समजतों ।। २९ ।। अहाहा ! ज्या अर्थी आपलें आगमन येथें झालें, त्या अर्थी आज आमचे पितर तृप्त झाले; आज आमचें कुल पवित्र झालें व आज हा आमचा यज्ञ खरोखर यथासांग पार पडला ।। ३० ।। हे द्विजपुत्रा, तुझ्या पादप्रक्षालनाच्या उदकांनीं मीं निष्पाप झालों असून यज्ञाग्नींची आज यथाविधि पूजा झाली आहे. तशीच ही माझी भूमीसुद्धां तुझ्या कोमल चरणांनीं पवित्र झाली आहे ।।३१।। हे ब्राह्मण बटो, तूं मजपासून कांहीं तरी मागण्यासाठीं आला आहेस असा माझा तर्क आहे. यास्तव जें जें तुझें इच्छित असेल तें तें मजपासून मागून घे. हे परमपूज्य ब्राह्मणा, गाय, सुवर्ण, सर्व साहित्यानें युद्ध व मधुर असें गृह, शुद्ध व मधुर असें अन्नपान, विवाहार्थ ब्राह्मणाची कन्या, समृद्ध असा गांव, घोडे, हत्ती अथवा रथ ह्यांतून जें तुला अपेक्षित असेल तें तूं मजपासून मागून घे ! ।। ३२ ।।

**अध्याय अठरावा समाप्त**

---

# अध्याय १९ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें यथार्थ व मधुर असें तें विरोचनपुत्र बलीचें धर्मयुक्त भाषण ऐकून प्रसन्न झालेल्या भगवंतानें प्रशंसापूर्वक त्याला उत्तर दिलें ॥ १ ॥

भगवान् म्हणाले,—हे लोकनाथा, ऐहिक व्यवहारांत भृगुकुलोत्पन्न शुक्रादि ब्राह्मण व पारलौकिक धर्माविषयीं तुझ्या कुळांतील वृद्ध व अत्यंत शांत असा तुझा आजोबा प्रल्हाद यांना तूं प्रमाण मानीत असल्यामुळें, तुझें हें वचन सत्य, कुलाला साजेसें, धर्मयुक्त आणि कीर्तिकारक आहे ॥ २ ॥ अहाहा ! तुझ्या कुळामध्यें, देत नाहीं, असें याचकाला म्हणणारा कोणी निःसत्त्व पुरुष अथवा प्रथमतः देण्याचें अभिवचन देऊन नंतर न देणारा असा कोणी कृपण पुरुष आजपर्यंत झाला नाहीं व पुढेंहि होणार नाहीं ॥ ३ ॥ आकाशामध्यें जसा चंद्र शोभतो तसा प्रल्हाद हा आपल्या निर्मळ यशानें तुमच्या कुळांत शोभत असल्यामुळें, दानसमयीं याचकानें अथवा युद्धसमयीं वीरानें प्रार्थना केली असतां पराङ्मुख होणारे असें धैर्यरहित राजे मुळींच झाले नाहींत ॥ ४ ॥ या तुझ्या कुळामध्यें उत्पन्न झालेला हिरण्याक्ष हातामध्यें गदा घेऊन दिग्विजयाकरितां ह्या पृथ्वीवर एकटाच फिरत असतां त्याला कोणीहि प्रतिपक्षी आढळला नाहीं ॥ ५ ॥ पुढें वराहरूप धारण करून विष्णु पृथ्वीला वर काढीत असतां त्याला अडथळा करावयास आलेल्या त्या हिरण्याक्षाला मोठ्या प्रयासानें त्यानें जिंकलें; पण हिरण्याक्षाचा विलक्षण पराक्रम पाहतां आपल्याला खरा विजय मिळाला असें मात्र त्याला वाटलें नाहीं ॥ ६ ॥ हिरण्याक्षाचा वध झाला हें ऐकून त्याचा भ्राता हिरण्यकशिपु क्रुद्ध होऊन आपल्या भावाला मारणाऱ्या त्या विष्णूचा वध करण्याकरितां वैकुंठलोकीं गेला ॥७॥ तेव्हां हातांत शूल घेऊन साक्षात् मृत्यूप्रमाणें येत असलेल्या त्या हिरण्यकशिपूला पाहून मायावी जनांमध्यें श्रेष्ठ व प्रसंग जाणणारा तो विष्णु मनांत विचार करूं लागला ॥ ८ ॥ त्याला वाटलें, प्राणी जिकडे जिकडे जातील तिकडे तिकडे त्यांच्या मागोमाग जसा मृत्यु जात असतो, त्याप्रमाणें मी जेथें जेथें जाईन तेथें तेथें हा दैत्य माझ्या मागोमाग येणारच. ह्यास्तव ह्या बाह्यदृष्टि हिरण्यकशिपूच्या हृदयामध्येंच आपण प्रवेश करावा ॥९॥ वामन म्हणतो,—हे दैत्याधिपते, ह्याप्रमाणें निश्चय करून भीतीमुळें ज्याच्या हृदयाला अत्यंत कंप सुटला आहे अशा विष्णूनें श्वासवायूमध्येंहि गुप्त होण्यासारखा सूक्ष्म देह धारण केला आणि आपल्याकडे धांवत येत असलेला शत्रु जो हिरण्यकशिपु त्याच्या नासिकाद्वारानें त्याच्या शरीरांत प्रवेश केला ॥१०॥ त्या वेळीं हिरण्यकशिपूनें शून्य असें त्या विष्णूचें स्थान सर्व बाजूंनीं शोधिलें; परंतु विष्णु त्याला त्यांत कोठेंच आढळला नाहीं. तेव्हां तो क्रुद्ध होऊन गर्जना करूं लागला आणि पुनः

पृथ्वी, स्वर्ग, दिशा, अंतरिक्ष, सप्तपाताळें व सप्तसमुद्र ह्या सर्व ठिकाणीं त्याचा शोध करूं लागला; पण त्या वीराला विष्णु कांही कोठें आढळला नाहीं ॥११॥ मग विष्णु सांपडत नाहीं असें पाहून तो दैत्य म्हणाला मी सर्व जग शोधिलें असतांहि ज्या अर्थी माझ्या भावाला मारणारा विष्णु कोठेंहि दृष्टीस पडत नाहीं, त्या अर्थी, ज्या ठिकाणीं गेलें असतां पुरुष परत येत नाहीं, त्या ब्रह्मस्वरूपाला तो गेला असला पाहिजे यांत संशय नाहीं ॥१२॥ वामन बलीला म्हणतो, ' हे दैत्याधिपते, देहाविषयीं अभिमान बाळगणाऱ्या शूरांचा वैरसंबंध इतकाच म्हणजे मरणापर्यंतच असतो. कारण वैर हें क्रोधापासून होतें आणि क्रोध हा अज्ञानापासून उत्पन्न होऊन अहंकारानें वृद्धिंगत होत असल्यामुळें तो मरणापर्यंत राहतो ॥ १३ ॥ हे दैत्यराजा, प्रल्हादाचा पुत्र व ब्राह्मणवत्सल असा तुझा पिता जो विरोचन त्याला ब्राह्मणवेष धारण करणारे आपले वैरी देवच आहेत, ब्राह्मण नव्हेत, असें ठाऊक होतें; तथापि त्या द्विजवेषधारी देवांनीं त्याची याचना केली असतां त्यानें त्यांना आपलें आयुष्य अर्पण केलें ॥१४॥ तूंहि महाकीर्तिमान् अशा गृहस्थाश्रम्यांनीं, शुक्रादिक ब्राह्मणांनीं, वैरोचनादि पूर्वजांनीं आणि दुसऱ्याहि शूर पुरुषांनीं आचरण केलेल्या धर्माचा स्वीकार केला आहेस ॥१५॥ यास्तव हे दैत्याधिपते, माझ्या पावलानें मोजिलेली तीन पावलांइतकीच अल्प भूमि मी तुज वरदश्रेष्ठापासून मागून घेतों ॥१६॥ हे राजा, अत्यंत उदार अशा तुज जगदीश्वरापासून मी दुसऱ्या अधिक कशाचीहि इच्छा करीत नाहीं. गरज लागेल तेवढ्याचाच स्वीकार ज्ञानी पुरुषानें करावा म्हणजे त्याला पातक लागत नाहीं ॥१७॥

बलिराजा म्हणाला,—हे ब्राह्मणपुत्रा, तुझें भाषण वृद्धानांहि संमत होईल असें आहे; तथापि तूं अल्पवयी असल्यामुळें स्वतःच्या कार्याविषयीं मात्र अडाणी माणसाप्रमाणें पोरकटच दिसतोस ॥१८॥ अरे, मी त्रैलोक्याचा एकटाच स्वामी असल्यामुळें जंबुप्लक्षादि द्वीपेंहि देण्यास समर्थ आहें, असें असतां आपल्या गोड भाषणानें मला प्रसन्न करून घेऊन जो तूं आपल्या पावलानें केवळ तीन पावलें भूमीची याचना करीत आहेस; तेव्हां तूं खरोखर अप्रबुद्ध आहेस ॥ १९ ॥ अरे, याचनेकरितां एकदां माझ्याजवळ आलेल्या पुरुषाला पुनः याचना करण्याचा प्रसंग येणें योग्य नाहीं. यास्तव अरे मुला, तुझी उपजीविका चालेल इतकी तरी भूमि मागून घे ॥ २० ॥ वामन म्हणाला,– हे राजा, त्रैलोक्यामध्यें जितके म्हणून अत्यंत प्रिय असे विषय आहेत ते सर्व जरी मिळाले तरीहि अजितेंद्रिय पुरुषाचे मनोरथ पूर्ण होत नाहींत ॥ २१ ॥ त्रिपाद भूमीनें जो असंतुष्ट असेल त्याला नऊ खंडांसहित उत्तम अशा सप्तद्वीपांची इच्छा असल्यामुळें त्याला जरी नऊ खंडानें युक्त संपूर्ण जंबुद्वीप दिलें तरी त्याची तृप्ति होत नाहीं ॥ २२ ॥ बरें, सप्तद्वीपवती पृथ्वी मिळून तरी समाधान होईल म्हणावें तर वनपुत्र पृथु, गय इत्यादि राजे सप्तद्वीपांचे अधिपति असूनही अर्थ व काम यांच्या मागें लागले व त्यांची तृष्णा कधींहि शांत झाली नाहीं असे आम्हीं ऐकिलें आहे ॥ २३ ॥ तेव्हां जो प्रारब्धवशेंकरून प्राप्त झालेल्या वस्तूनें संतुष्ट होतो तोच सुखानें राहतो व अजितेंद्रिय मनुष्याला तिन्ही लोक प्राप्त झाले

असतांहि तो असंतुष्टच राहतो. त्याला कधींच सुख मिळत नाहीं ॥ २४ ॥ अर्थ व काम ह्यांविषयीं असंतोष हेंच पुरुषाला संसारांत पाडणारें कारण होय आणि उलट सहज मिळालेल्या वस्तूनें संतोष होणें हें पुरुषाला मोक्षप्राप्तीचें साधन होय, असें म्हटलें आहे ॥ २५ ॥ दैवानें प्राप्त झालेल्या वस्तूनें संतुष्ट होणाऱ्या ब्राह्मणाचें तेज वृद्धिंगत होतें व उदकानें अग्नि जसा विझून जातो तसें असंतोषानें तें तेज नाहींसें होतें; ॥ २६ ॥ यास्तव हे वरदश्रेष्ठ राजा, तुझ्यापासून मी तीन पावलेंच भूमि मागतों व तेवढ्यानेंच मी कृतार्थ होईन. कारण, द्रव्य जर कार्यापुरतें असलें तरच तें सुखप्रद होतें ॥ २७ ॥

शुकाचार्य म्हणतात,—हे राजा, याप्रमाणें भगवंतानें बलिराजाला उत्तर दिलें असतां तो हंसत हंसत म्हणाला, "बरें तर, तुझ्या इच्छेला येईल तेवढेंच घे" असें म्हणून त्यानें वामनाला भूमिदान देण्याकरितां हातांत पाण्याचें भांडें घेतलें ॥ २८ ॥ तेव्हां ज्ञानीपुरुषांमध्यें श्रेष्ठ अशा शुक्राचार्यानें बलिराजाचें सर्वस्व हरण करण्याचा विष्णूचा आशय आहे असें जाणून, त्या वामनरूपी विष्णूला पृथ्वी देण्यास उद्युक्त झालेल्या आपल्या शिष्याला उपदेश केला ॥ २९ ॥ शुक्र म्हणाला, —हे विरोचनपुत्रा बलिराजा, देवांचें कार्य साधण्याकरितां कश्यपापासून अदितीच्या पोटीं हा प्रत्यक्ष अविनाशी भगवान् विष्णु अवतीर्ण झाला आहे ॥ ३० ॥ यास्तव पुढें होणारा अनर्थ न जाणतां तूं ह्याला भूमिदान देण्याचें जें वचन दिलेंस तें चांगलें दिसत नाहीं. ही गोष्ट म्हणजे दैत्यांवर आलेलें मोठें संकटच होय ॥ ३१ ॥ मायेनें ब्राह्मणरूप धारण करून येथें आलेला हा श्रीहरि तुझें स्थान, ऐश्वर्य, संपत्ति, तेज व जगप्रसिद्ध कीर्ति हीं सर्व हरण करून इंद्राला देईल ॥ ३२ ॥ हा विश्वरूप होऊन फक्त तीनच पावलांनीं हे तीन्ही लोक व्यापून टाकील. हे मूढा, विष्णूला सर्वस्व अर्पण करून तूं आपला निर्वाह तरी कसा करशील ? ॥३३॥ हे दैत्याधिपते, एका पायानें पृथ्वी, दुसऱ्यानें स्वर्ग आणि आपल्या मोठ्या देहानें अंतरिक्ष व्यापून टाकणाऱ्या ह्या सर्वव्यापी परमेश्वराच्या तिसऱ्या पावलाला स्थान कोठें मिळणार ? ॥ ३४ ॥ आणि एकदां देतों म्हणून म्हटलेली वस्तु प्रत्यक्ष देण्यास तूं असमर्थ झाला असतां तुला नरकांत पडावें लागणार असें मला वाटतें. कारण दिलेलें वचन पुरें करण्यास तूं असमर्थ आहेस ॥ ३५ ॥ हे असुरश्रेष्ठा, ज्याच्या योगानें निर्वाहाचें साधनच नष्ट होतें त्या दानाची श्रेष्ठ लोक प्रशंसा करीत नाहींत. कारण, दान, यज्ञ, चित्तैकाग्र्य आणि धर्मार्थ धर्मशाळा इत्यादि बांधणें या गोष्टी निर्वाहाचें साधन जवळ असलेल्या पुरुषाच्या हातूनच घडतात ॥ ३६ ॥ पुण्योत्पत्ति, सत्कीर्तिलाभ, धनवृद्ध्यर्थ व्यापार, स्वतःचा उपभोग आणि स्वजनांचा संतोष, ह्या पांच गोष्टींकरितां द्रव्याची विभागणी करणाऱ्या पुरुषालाच इहलोकीं आनंद मिळतो ॥ ३७ ॥ हे असुरश्रेष्ठा, ह्या सत्यानृतव्यवस्थेसंबंधीं ऋग्वेदश्रुतीमध्यें जें सांगितलें आहे तें मी तुला सांगतों, तें ऐक. 'होय' असें म्हणून जें सांगितलें तें सत्य व 'नाहीं' म्हणून जें म्हटलें तेंच अनृत होय ॥ ३८ ॥ देहरूप वृक्षाचें सत्य हें पुष्प व फळ जाणावें असें श्रुतीनें सांगितलें आहे; परंतु हा देहरूपवृक्ष जर जिवंत न राहील तर सत्यरूप पुष्पफळ तरी प्राप्त कसें होणार ? यास्तव अनृत हेंच मूळ होय. म्हणजे खोटें बोलूनहि देहाचें रक्षण

करावें ॥ ३९ ॥ कारण, ज्याप्रमाणें मुळें उपटलेला वृक्ष शुष्क होऊन लवकरच खालीं पडतो, त्याप्रमाणें ज्याचें अनृत नष्ट झालें आहे तो देहहि तत्काळ शुष्क होतो ह्यांत संशय नाहीं ॥ ४० ॥ हे दैत्यराजा, देतों, हा जो शब्द याचकद्वारानें द्रव्य घेऊन दूर जातो म्हणून तो रिक्त म्हणजे अपूर्ण होय. याचकाला जें काहीं देतों असें म्हणतों, त्याच्या योगेंकरून आपण द्रव्यशून्य होतोंच; पण त्यांतूनहि याचकाला सर्वच देईन असें म्हणणाऱ्या पुरुषाला आपल्या स्वतःचा निर्वाह करण्याचेंहि सामर्थ्य राहात नाहीं ॥ ४१ ॥ उलट कांहीं देत नाहीं हें जें अनृत भाषण, तें शुद्ध आप्पलपोटेपणाचें असून केवळ दुसऱ्याचें द्रव्य आकर्षण करणारेंच आहे. जो पुरुष माझ्याजवळ कांहीं नाहीं असें नित्य म्हणतो, तो त्या अनृतभाषणानें लोकांपासून द्रव्य मिळवितो. तेव्हां हे दैत्यराजा, नाहीं असें अनृत भाषण जो नित्यच करीत असतो त्याची अपकीर्ति होते व तो जिवंत असूनहि मेल्यासारखाच समजावा ॥ ४२ ॥ पण हे विरोचनपुत्रा, स्त्रियांना वश करतांना, विनोदामध्यें, विवाहासाठीं, कन्या मिळविण्याकरितांस्तुति करतांना, उपजीविकेचें साधन मिळविण्यासाठीं, प्राणांवर संकट आलें असतां, गोब्राह्मणांचें हित करतांना व एखाद्याची हिंसा टाळण्यासाठीं अनृत भाषण केलें, तर तें निंद्य होत नाहीं ॥ ४३ ॥

## अध्याय एकोणिसावा समाप्त

---

# अध्याय २० वा

शुक्राचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें कुळगुरु शुक्राचार्यांनें यज्ञकर्त्या बलीला सांगितलें असतां तें त्यानें लक्षपूर्वक ऐकून घेतलें आणि क्षणभर स्वस्थ राहून त्यानें गुरूला उत्तर दिलें ॥ १ ॥

बली म्हणाला,– हे गुरो, अर्थ, काम, यश आणि निर्वाहाचें साधन ह्यांना जो कधीहि बाधा करणार नाहीं, तोच गृहस्थाश्रमी पुरुषांचा धर्म होय, असें जें आपण सांगितलें तें सत्य आहे ॥ २ ॥ परंतु विरोचनाचा पुत्र असा मीं, ब्राह्मणाला देतों असें वचन देऊन एखाद्या वंचकाप्रमाणें केवळ द्रव्यलोभानें 'देत नाहीं' असें पुन: कसें म्हणूं? ॥ ३ ॥ असत्याहून मोठा अधर्म नाहीं. यास्तव खोटें बोलणाऱ्या मनुष्याखेरीज इतर कांहींहि सहन करणें मला शक्य आहे असें पृथ्वीनेंहि सांगितलें आहे ॥ ४ ॥ असत्य न बोलल्यास विपत्ति येईल असें आपण सांगितलें; परंतु हे आचार्या, ब्राह्मणाला फसविणें या गोष्टीला जसा मी भितों तसा नरकाला, दु:खाचा सागर अशा दारिद्र्याला, स्थानभ्रंशाला व मृत्यूलाहि मीं भीत नाहीं ॥ ५ ॥ मनुष्य मरण पावला असतां त्याचें जें जें धन असेल तें त्याला सोडणारच. मग त्या द्रव्यानें जर ब्राह्मण संतुष्ट होणार नाहीं तर त्या त्यागाचा उपयोग काय? ॥ ६ ॥ हे आचार्य, दधीचि, शिबि इत्यादि साधु लोक, टाकण्यास अशक्य अशा प्राणांनींहि प्राणिमात्रावर उपकार करितात; मग भूमीसारखी वस्तु देतांना कसला विचार पडणार? ॥७॥ हे ब्रह्मनिष्ठा शुक्राचार्या, युद्धांतून मागें न फिरणाऱ्या अशा ज्या दैत्याधिपतींनीं ह्या पृथ्वीचा उपभोग घेतला आहे त्यांनीं मिळविलेले भोग कालानें केव्हांच नष्ट करून टाकिले; परंतु या लोकीं त्यांनीं जी कीर्ति मिळविली ती कांहीं त्याला नाहींशी करतां आली नाहीं ॥ ८ ॥ हे ब्रह्मर्षे, युद्धामध्यें माघार न घेतां देहत्याग करणारे लोक या लोकीं पुष्कळ आढळतात; पण सत्पात्र याचक प्राप्त झाला असतां त्याला श्रद्धापूर्वक धन देणारे तसे आढळत नाहींत ॥ ९ ॥ हे गुरो, य:कश्चित् याचकाची कामना पूर्ण केल्यानें दानशूर दयाळु पुरुषाला जर दैन्य प्राप्त झालें तर तें त्याला कल्याणकारकच आहे. मग तुम्हांसारख्या ब्रह्मवेत्त्याची कामना पूर्ण केल्यानें मला दैन्य आल्यास तें कल्याणकारक होईल यांत काय संशय? यास्तव ह्या ब्राह्मणाची जी इच्छित गोष्ट आहे ती मी त्याला अर्पण करितों ॥ १० ॥ हे मुने, वेदोक्त अनुष्ठानामध्यें कुशल असे आपण आदरपूर्वक यज्ञयागांच्या योगानें ज्याचें आराधन करितां, तो हा विष्णु माझा हितकर्ता असो अथवा शत्रु असो, ह्यानें इच्छिलेली भूमि मी ह्याला देतोंच ॥ ११ ॥ याला मी सर्वस्व अर्पण केल्यास निरपराधी अशा मला जरी हा अधर्मानें बंधन करणार असेल तरी देखील, ह्या शत्रूनें भयभीत होऊन ब्राह्मणरूप धारण केलें असल्यामुळें मी ह्याचा वध

करणार नाहीं ॥ १२ ॥ पण जर हा सत्कीर्तिमान् विष्णुच असेल तर तो आपल्या कीर्तीचा त्याग करण्याची इच्छा कधींच करणार नाहीं; मी जर पृथ्वी न दिली तर युद्धामध्यें माझा वध करून तो तिला हरण करील किंवा माझ्या हातून मृत होऊन भूमीवर तरी शयन करील ॥ १३ ॥

शुकाचार्य म्हणाले,– हे राजा, ह्याप्रमाणें आपल्या वचनावर श्रद्धा न ठेवणाऱ्या व आपल्या आज्ञेचें उल्लंघन करणाऱ्या त्या सत्यप्रतिज्ञ उदारचित्त शिष्याला दैवानें प्रेरित झाल्यामुळें गुरु शुक्राचार्यांनें शाप दिला ॥ १४ ॥ तो म्हणाला,---अरे, वस्तुत: अज्ञानी व उद्धट असूनहि आपणाला पंडित मानणारा जो तूं माझ्या आज्ञेचें उल्लंघन करीत आहेस, तो तूं माझी उपेक्षा केल्यामुळें लवकरच ऐश्वर्यापासून भ्रष्ट होशील ॥ १५ ॥ ह्याप्रमाणें आपल्या गुरूनें शाप दिला असतांहि महात्म्या बलीनें सत्यापासून भ्रष्ट न होता वामनाचें पूजन करून त्याला उदकपूर्वक पृथ्वीचें दान केलें ॥ १६ ॥ त्या वेळीं मोत्यांच्या व रत्नांच्या सरांची माळा धारण करणारी बलीची पत्नी विंध्यावली वामनाचे पाय धुण्यासाठीं उदकानें भरलेला सुवर्णाचा कलश घेऊन तेथें आली ॥ १७ ॥ मग यज्ञकर्त्या बलीनें स्वत: त्या वामनाच्या सुंदर चरणयुगलांचें आनंदानें प्रक्षालन केलें आणि तें जगाला पावन करणारें तीर्थोदक आपल्या मस्तकीं धारण केलें ॥ १८ ॥ तेव्हां स्वर्गांतील देव, गंधर्व, विद्याधर, सिद्ध व चारण हे सर्वहि त्याच्या सत्यपालनरूप कर्माची व सरळपणाची प्रशंसा करीत आनंदानें त्या दैत्याधिपतीवर पुष्पवृष्टि करूं लागले ॥ १९ ॥ हजारों दुंदुभि वारंवार वाजूं लागल्या आणि त्रिपाद भूमीच्या मिषानें हा त्रैलोक्य हरण करील हें जाणत असूनहि त्या उदारचित्त बलीनें शत्रूला त्रैलोक्य अर्पण केलें. फारच दुष्कर असें कृत्य बलीनें केलें असें म्हणत गंधर्व, किंपुरुष व किन्नर गायन करूं लागले ॥ २० ॥ मग अनंत अशा श्रीहरीचें त्रिगुणात्मक वामनरूप वाढूं लागलें आणि भूमि, आकाश, दिशा, स्वर्ग, सप्तपाताळें, सप्त सागर, पशु, पक्षी, नर, देव आणि ऋषि हे सर्व त्यांमध्यें आहेत असें दिसूं लागलें ॥ २१ ॥ तेव्हां ऋत्विज, आचार्य व सभासद ह्यांसह बलीला त्या महाविभूतिमान् श्रीहरीच्या त्रिगुणात्मक देहामध्यें भूतें, इंद्रियें, शब्दादि विषय, अंत:करण आणि जीव ह्यांनीं युक्त असलेलें त्रिगुणकार्यरूप हें सारें विश्व दिसून आलें ॥ २२ ॥ हे राजा, इंद्राच्या सेनेप्रमाणें ज्याची सेना आहे अशा त्या बलीनें त्या विश्वमूर्ति पुरुषोत्तमाच्या पायांच्या तळाशीं रसातल पाहिलें, पायांजवळ पृथ्वी पाहिली, पोटऱ्यांपाशीं पर्वत पाहिले, गुडघ्यांवर पक्षी पाहिले आणि मांड्यांमध्यें वायुसमुदाय आढळून आले ॥ २३ ॥ त्या सर्वव्यापी ऊरुक्रमाच्या वस्त्रांत त्याला संध्या दिसली, गुह्यस्थानीं प्रजापति दिसले, स्वत:सह मोठे मोठे असुर जघनावर आढळले आणि खांकेमध्यें सप्तसागर पाहावयास मिळाले व वक्ष:स्थळावर नक्षत्रमाला आढळून आली ॥ २४ ॥ हे राजा, त्या मुरारीच्या हृदयावर बळीनें धर्माला पाहिलें, स्तनांवर ऋत आणि सत्य हीं पाहिलीं, मनामध्यें त्याला चंद्र दिसला, वक्ष:स्थलावर हातामध्यें कमळ धारण केलेली लक्ष्मी दिसली

व कंठामध्यें सामवेद आणि सर्व शब्द हे त्याच्या दृष्टीस पडले ॥ २५ ॥ वामनाच्या बाहूंत त्याला इंद्रप्रभृति देव आढळले, कानांच्या जागीं दिशा दिसल्या, मस्तकावर स्वर्ग दृष्टीस पडला, केसांमध्यें मेघ दिसले, नाकाच्या ठिकाणीं प्राणवायु आढळला, डोळ्यांत सूर्य दिसला आणि मुखामध्यें अग्नि आढळून आला ॥ २६ ॥ त्या पुरुषोत्तमाच्या वाणींत चारहि वेद होते, जिव्हेवर वरुण होता, भुवयांच्या ठिकाणीं विधि व निषेध होते, पापण्यांवर दिवस व रात्र होतीं आणि ललाटस्थानीं क्रोध व ओठांवर लोभ होते, असें त्यानें पाहिलें ॥ २७ ॥ हे राजा, परमेश्वराच्या त्वगिंद्रियाच्या ठिकाणीं काम त्याला दिसला, रेतस्थानीं जल दिसलें, पृष्ठभागीं अधर्म आढळला, पावलांमध्यें यज्ञ दृष्टीस पडला, छायेमध्यें मृत्यु आढळून आला आणि हास्यांत मायाशक्ति व केंसांमध्यें सर्व औषधि त्या बलीला पाहावयास मिळाल्या ॥ २८ ॥ त्या पराक्रमी बलिराजाला वामनाच्या नाड्या ह्या नद्या दिसल्या, नखांमध्यें शिला आढळल्या, बुद्धीमध्यें ब्रह्मदेव दृष्टीस पडला, इंद्रियांच्या ठिकाणीं सारे देव व ऋषि आढळून आले आणि सर्व देहामध्यें स्थावरजंगमात्मक सर्व भूतें पाहावयास मिळालीं ॥ २९ ॥ हे राजा, सर्वात्म्या भगवंताच्या ठिकाणीं हें सर्व विश्व अवलोकन करून सर्व असुर भयभीत झाले आणि त्यांना मूर्च्छाच आली. असो. वामनाच्या हातांत असह्य तेजाचें सुदर्शनचक्र मेघाप्रमाणें शब्द करणारें शार्ङ्ग धनुष्य, पर्जन्यासारखा घोष करणारा पांचजन्य शंख, विष्णूची महावेगवती कौमोदकी गदा, चमक्या बसविलेल्या ढालीसह विद्याधर खड्ग आणि ज्यांतील बाण कधींही संपत नाहींत असे सर्वोत्कृष्ट भाते शोभत होते ॥ ३० ॥ ॥ ३१ ॥ त्या वेळीं लोकपालांसह सुनंदनंद-प्रभृति मुख्य पार्षद हे त्या ईश्वराची स्तुति करीत होते. हे राजा, देदीप्यमान किरीट, बाहुभूषणें व मकराकार कुंडलें धारण केलेला तो भगवान् वामन श्रीवत्सलांछन, रत्नांमध्यें श्रेष्ठ असा कौस्तुभमणि, मेखला पीतांबर आणि भ्रमरसमुदायांनीं युक्त असलेली वनमाला ह्यांच्या योगानें अतिशय शोभूं लागला; व हे राजा एका पावलानें बलीची पृथ्वी, शरिरानें आकाश व बाहूंनीं दिशा अशीं त्या त्रिविक्रमानें व्यापून टाकिलीं ॥ ३२ ॥ ॥ ३३ ॥ नंतर तो दुसरें पाऊल टाकीत असतां त्याला त्या बलीचा स्वर्ग-लोक अगदीं थोडाच झाला व ह्यामुळें तिसरें पाऊल टाकण्यास तर त्या बलीचें अणुरेणु-इतकें सुद्धां स्थान अवशिष्ट राहिलें नाहीं. कारण, दुसऱ्या पावलाच्या वेळींच त्या त्रिविक्रमाचें चरणकमळ स्वर्गाच्या वरतीं जातांजातां महर्लोक, जनोलोक व तपोलोक ह्यांच्या पलीकडे असलेल्या सत्यलोकाला जाऊन पोंचलें ॥ ३४ ॥

॥ अध्याय विसावा समाप्त ॥

---

# अध्याय २१ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, सत्यलोकाला जाऊन लागलेलें तें भगवंताचें चरणकमल पाहून त्याच्या चंद्रासारख्या तेजस्वी नखांच्या प्रभेनें ब्रह्मदेवाच्या सत्यलोकाचे तेज नष्ट झालें आणि तो आपल्या गणांना समागमें घेऊन भगवान् वामनाच्या समोर आला. मरीचिप्रभृति ऋषि, नारदादि नैष्टिक ब्रह्मचारी आणि सनंदनप्रभृति योगीहि तेथें आले. त्यांच्या बरोबर मूर्तिमंत वेद, उपवेद, नियमासह यम, तर्कशास्त्र, इतिहास, वेदांगें, पुराणें, संहिता हीं होतीं. याशिवाय योगरूप वायूनें प्रदीप्त झालेल्या ज्ञानाग्नीच्या योगानें ज्याचा कर्मफळरूपी मल दग्ध झाला आहे असे इतरहि योगी तेथें आले आणि ज्याच्या स्मरणाच्या प्रभावामुळें कर्मांनीं अप्राप्य अशा ब्रह्मलोकाला जे होते त्या सर्वांनीं वामनाच्या चरणकमळाला वंदन केलें ॥१॥ ॥२॥ नंतर शुद्धकीर्ति ब्रह्मदेव स्वत: ज्याच्या नाभिकमळापासून उत्पन्न झाला, त्या विष्णूच्या फार उंच गेलेल्या चरणाला त्यानें अर्घ्य समर्पण केलें आणि त्याचें पूजन करून भक्तिपूर्वक स्तवन केलें ॥ ३ ॥ हे परीक्षित्‌राजा, तें ब्रह्मदेवाच्या कमंडलूंतील उदक त्रिविक्रमाच्या पादप्रक्षालनानें पवित्र होऊन स्वर्गातील गंगानदी बनलें. ती गंगा आकाशांतून ध्रुवमंडळ,मेरु, इत्यादि क्रमानें खालीं पडत असून भगवंताची निर्मळ कीर्तीच कीं काय अशी ती त्रैलोक्यांना पवित्र करते ॥४॥ नंतर भगवंतानें आपल्या विराट् स्वरूपाचें आकुंचन करून पूर्वीप्रमाणें वामनरूप धारण केलें आणि ब्रह्मादि लोकपालांनीं मोठ्या आदरानें आपल्या अनुयायांसह आपल्या स्वामीचें पूजन केलें ॥५॥उत्तम प्रकारचीं पंचभूतादिक पूजासाहित्यें, सुगंधि उदकें, माळ, दिव्यगंधयुक्त उट्या, सुवासिक धूप-दीप लाह्या, अक्षता, फळें, अंकुर हीं त्यांनीं भगवंताला अर्पण केलीं. त्याचा पराक्रम आणि माहात्म्य वर्णन करणारीं स्तोत्रें गायिलीं आणि नृत्य, वाद्यें, गीतें व शंखदुंदुभींचे नाद ह्यांच्या घोषांत त्याचा जयजयकार केला ॥६॥ ७॥ त्या वेळीं मनासारखा ज्याचा वेग आहे असा अस्वलांचा राजा जो जांबवान् त्यानें तर दुंदुभि वाजवून सर्व दिशांमध्यें मोठा आनंद उत्पन्न होईल अशारीतीनें वामनाचा जयघोष केला॥८॥ तेव्हां यज्ञ करण्याचा संकल्प करून बसलेल्या आपल्या अधिपतीची सर्व पृथ्वी कपटानें तीन पावलें भूमि मागून वामनानें हरण केली ही गोष्ट असुरांना सहन झाली नाहीं. ते अतिशय क्रुद्ध होऊन परस्परांशीं भाषण करूं लागले ॥९॥ ते म्हणाले, अहा, हा कोणी अधम ब्राह्मण नसून मायावी पुरुषांमध्यें श्रेष्ठ असा विष्णुच होय व ब्राह्मणाच्या वेषानें आपलें स्वरूप झांकून देवांचें कार्य साधण्याची इच्छा करीत आहे ॥१०॥ यज्ञदीक्षा घेतल्यामुळें दुष्टांना दंड करण्याचें बंद ठेवलेल्या आमच्या अधिपतीचें सर्वस्व, याचना करणाऱ्या या बटुरूपी शत्रूनें हरण की हो केलें ! ॥ ११ ॥ आमचा अधिपति सर्वदा सत्यसंकल्प असून सध्यां तर त्यानें यज्ञाची

दीक्षा घेतली आहे. तो ब्राह्मणभक्त व दयाळू असून खोटें भाषण करणें त्याला अशक्य आहे ॥ १२ ॥ यास्तव ह्या बटूचा वध करून आपल्या यजमानाचीहि सेवा करणें हा आपला धर्म होय; असें म्हणून त्या दैत्याधिपति बलीच्या अनुयायी असुरांनीं हातांत आयुधें घेतलीं आणि हे राजा, ते सर्व क्रुद्ध झालेले दैत्य बलीची इच्छा नसतांहि हातांमध्यें शूल, पट्टिश इत्यादि आयुधें घेऊन वामनाला मारण्याकरितां त्याच्यावर धावले ॥ १३ ॥ १४ ॥ त्या वेळीं वामनाच्या अंगावर धावून येणाऱ्या त्या दैत्यसेनाधिपतींना अवलोकन करून विष्णूच्या सेवकांनीं हास्य केलें आणि आपलीं आयुधें उचलून त्यांचें निवारण केलें ॥१५॥ नंतर नंद, सुनंद, जय, विजय, प्रबल, बल, कुमुद कुमुदाक्ष, विश्वक्सेन, गरुड, जयंत, श्रुतदेव, पुष्पदंत व सात्वत ह्या दहा हजार हत्तींचें बळ असणाऱ्या सर्व विष्णुपार्षदांनीं ती दैत्यसेना मारून टाकिली ॥ १६ ॥ १७ ॥ तेव्हां विष्णुदूत आपल्या सेनाधिपतींना मारीत आहेत असें पाहून बलीला शुक्राचार्यांच्या शापाचें स्मरण झालें आणि अतिक्रुद्ध झालेल्या आपल्या सैनिकांचें त्यानें निवारण केलें ॥ १८ ॥ हे विप्रचित्ते, हे राहो, हे नेमे, माझें भाषण ऐका ! हा काल आपल्याला अनुकूळ नाहीं,यास्तव युद्ध न करितां मागें फिरा ! ॥ १९ ॥ हे दैत्यहो, सर्व प्राण्यांना सुखदुःख देण्याला समर्थ असा जो काळ, त्याचें केवळ स्वतःच्या पराक्रमावर उल्लंघन करण्यास कोणीहि पुरुष समर्थ नाहीं ॥ २० ॥ अहो, जो कालरूपी भगवान् पूर्वी कल्याण करण्यास कारणीभूत होता, तोच आतां आम्हांवर उलटला आहे ॥ २१ ॥ केवळ बल, मंत्री, बुद्धि, किल्ले, मंत्र ओषधि व सामादिक उपाय ह्यांच्या जोरावर कोणालाहि काळाचें अतिक्रमण करणें शक्य नाहीं ॥ २२ ॥ दैवानें बलाढ्य झालेले तुम्ही, पूर्वी या श्रीहरीच्या अनुचरांना पुष्कळ वेळां जिंकिलें होतें; परंतु तेच आतां युद्धामध्यें आम्हांला जिंकून विजयगर्जना करीत आहेत ॥ २३ ॥ दैव जर आम्हांला अनुकूळ होईल तर पुनःहि आम्हीं ह्यांना जिंकूं ; करितां आपल्या कार्यसाधनाला अनुकूळ काळ येईपर्यंत तुम्हीं वाट पाहा ॥ २४ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे परिक्षित्‌राजा, आपल्या यजमानाचें हें भाषण ऐकून विष्णुदूतांकडून पराभव पावलेले दैत्यदानवांचे ते सेनापति रसातळामध्यें प्रविष्ट झाले ॥ २५ ॥ नंतर प्रभूचा अभिप्राय जाणून पक्षिराज गरुडानें यज्ञामध्यें सोमरस काढण्याच्या दिवशीं वारुणपाशांनीं बलीला बांधून टाकिलें ॥ २६ ॥ अशा रीतीनें शक्तिमान् विष्णूनें दैत्यपति बलीला गरुडाकडून बांधविलें असतां स्वर्गांत, पृथ्वीवर व इतरहि सर्वत्र हाहाकार झाला ॥ २७ ॥ हे राजा, याप्रमाणें स्थिरबुद्धीचा व उदारकीर्ति असा तो बलिराजा ऐश्वर्यभ्रष्ट होऊन वरुणपाशांनीं बद्ध झाला असतां, भगवान् वामन त्याला म्हणाला, ॥ २८ ॥ हे असुरा, तूं मला तीन पावलें भूमि दिली आहेस, त्यांपैकीं दोन पावलांनीं मीं तुझी सर्व पृथ्वी व्यापून टाकिली, आतां तिसऱ्या पावलाची काय ती व्यवस्था कर ! ॥ २९ ॥ हे दैत्या, सूर्य किरणांनीं व चंद्र नक्षत्रासह जेथपर्यंत प्रकाशत आहे आणि जेथपर्यंत पर्जन्य वृष्टि करीत आहे, तितकीच भूमि तुझी होय ॥ ३० ॥ तीपैकीं एका

पायानें मीं भूलोक व देहानें अंतरिक्ष आणि दिशा व्यापिल्या असून दुसऱ्या पायानें स्वर्गलोक व्यापिला आहे. ह्याप्रमाणें तुझ्या देखत तुझ्या सर्वस्वाचें मीं आपल्या देहानें आक्रमण केलें आहे ।। २१ ।। आतां देतों म्हणून सांगितलेलें तिसरें पाऊल जर तुला देतां येत नसेल तर तुला नरकांत वास करणें अवश्य आहे. तरी गुरु शुक्राचार्यांचे अनुमोदनाप्रमाणें तूं आतां नरकामध्यें प्रवेश कर ! ।। ३२ ।। जो मनुष्य वाचादत्त केलेली वस्तु न देऊन याचकाला फसवितो त्याचा मनोरथहि व्यर्थ होतो, मग स्वर्गाची गोष्ट कशाला ? तो दूरच राहून त्याला नरकामध्यें पडावें लागतें ।। ३३ ।। यास्तव मी त्रैलोक्याचा अधिपति आहें, असा अभिमान करणाऱ्या तूं, त्रिपाद भूमि देतों असें सांगून ज्या अर्थी मला फसविलें, त्या अर्थी त्या असत्याचें फल म्हणून तूं कांहीं वर्षे नरकवास भोग ! ।। ३४ ।।

## अध्याय एकविसावा समाप्त

# अध्याय २२ वा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें भगवंतानें धिक्कार करून बलिराजाचें मन निश्चयापासून ढळविण्याचा यत्न केला असतांहि बलिराजा वचनापासून ढळला नाहीं आणि निर्धास्तपणें भगवंताला उत्तर देऊं लागला ॥१॥

बलि म्हणाला,—हे देवश्रेष्ठा, तुझी कीर्ति सर्वश्रेष्ठ आहे. तुला मीं दिलेलें वचन खोटें होत आहे असें जर तुला वाटत असेल तर मी तें माझें वचन खरें करून तुझी फसवणूक माझ्या हातून होणार नाहीं असें करितों. तूं आपलें तिसरें पाऊल माझ्या मस्तकावर ठेव ! ॥ २ ॥ मला अपकीर्तीचें जसें फार भय वाटतें तसें नरकाचें वाटत नाहीं. तसेंच स्थाननाशाचें किंवा तूं पाशांनीं बांधल्याचेंहि दुःख मला होत नाहीं. दुसरें कोणतेंहि अनुल्लंघनीय संकट, द्रव्याची अडचण किंवा तुझ्याकडून प्राप्त होणारें बंधन, यांचेंहि मला भय वाटत नाहीं ॥ ३ ॥ परमपूज्य लोकांनीं मनुष्यांना केलेला दंड अत्यंत कल्याणप्रदच आहे असें मी मानितों. कारण, माता, पिता, भाऊ व मित्र हे तसा दंड करीत नाहींत ॥ ४ ॥ हे परमेश्वरा, तूं आम्हां असुरांचा अप्रत्यक्ष हितकर्ता श्रेष्ठ गुरुच आहेस. कारण शौर्यवीर्यादिकांविषयींच्या विविध मदानें अंध झालेल्या आमचें ऐश्वर्य नष्ट करून तूं आम्हांला नवी दृष्टीच देतोस ॥ ५ ॥ एकनिष्ठ अशा योग्यांना जी सिद्धि प्राप्त होते, ती सिद्धि पुष्कळ असुरांना तुझ्याविषयीं दृढ वैर धरल्यानेंच प्राप्त झाली आहे ॥ ६ ॥ तेव्हां अत्यंत पराक्रमी अशा तूं मला धरून वरुणपाशांनीं बांधिलें असतां लज्जा वाटण्याचें किंवा दुःखी होण्याचें मला कांहींच कारण नाहीं ॥ ७ ॥ माझा आजोबा प्रल्हाद हा तुला अत्यंत मान्य असून साधु म्हणून सर्वत्र प्रसिद्ध आहे; पण तुझा त्यानें सर्वस्वीं आश्रय केल्यामुळें, तुझ्याशीं वैर धरिलेल्या त्याच्या पित्यानें त्याचा क्रूरपणें अनेक प्रकारचा छळ केला ॥ ८ ॥ शरीर हें शेवटीं सुटणारच, मग त्याचा काय उपयोग ! तसेंच स्वजन म्हणून म्हणविणारे, हे द्रव्य हरण करणारे चोरच असल्यामुळें त्यांशीं काय कर्तव्य आहे ? स्त्री ही एकंदरींत संसारालाच कारणीभूत होत असल्यामुळें ती तरी काय करावयाची ? आणि घरादारांच्या योगें मनुष्याचें आयुष्य मात्र व्यर्थ जात असल्यामुळें त्यांचेंहि प्रयोजन काय ? असा विचार केल्यामुळें त्या माझ्या थोर, अत्यंत ज्ञानी आणि साधूंमध्यें श्रेष्ठ अशा आजोबाला लोकसंगतीचें भय वाटलें आणि तूं त्याच्या असुरपक्षाचा नाश करणारा असतांहि तुझ्या अढळ चरणकमळाचाच त्यानें सर्वस्वीं भयरहित म्हणून आश्रय केला ॥९॥ ॥ १० ॥ आणि आतां मलाहि दैवानें, बलात्कारानें वैभवाचा त्याग करावयास लावून तूं जो आमचा प्रतिस्पर्धी त्याच्यापाशीं आणिलें आहे. या जगांतील प्राणिमात्रांचें हें अशाश्वत जीवन मृत्यूच्या अगदीं हातीं असूनहि या वैभवानें मोहित केल्यामुळें मनुष्याला तें तसें आहे हें कळत नाहीं ॥ ११ ॥

शुकाचार्य म्हणाले,–हे कुरुश्रेष्ठा, बलिराजा ह्याप्रमाणें भाषण करीत आहे इतक्यांत उदय पावलेल्या पूर्ण चंद्राप्रमाणें प्रकाशणारा असा भगवद्भक्त प्रल्हाद त्या ठिकाणीं येऊन पोहोंचला ॥ १२ ॥ कमळाप्रमाणें दीर्घ नेत्र, बांध्यानें उंच, पीतवस्त्र, श्यामवर्ण, आजानुबाहु, सुंदर व उज्ज्वल कांतीनें शोभणाऱ्या अशा त्या आपल्या पितामहाला बलीनें पाहिलें; पण वरुणपाशांनीं बद्ध असल्यामुळें पूर्वीप्रमाणें त्याचें त्याला पूजन करितां आलें नाहीं आणि म्हणून केवळ मस्तकानें त्याला प्रणाम करून अश्रूंनीं ज्याचे नेत्र भरून गेले आहेत असा तो बलिराजा लाजेनें तोंड खालीं करून राहिला ॥ १३ ॥ १४ ॥ त्या उदारचित्त प्रल्हादाला सज्जनांचा पालक व सुनंदनंदप्रभृति पार्षदगण ज्याची सेवा करीत आहेत असा भगवान् तेथें बसलेला दिसतांच त्याच्या हर्षानें रोमांच उभे राहिले व नेत्रांमध्यें आनंदाश्रूंचा पूर लोटून तो थोर मनाचा भक्त भगवंताजवळ गेला आणि भूमीवर मस्तक ठेवून त्याला त्यानें साष्टांग नमस्कार घातला ॥ १५ ॥

नंतर प्रल्हाद म्हणाला,–हे भगवंता, तें समृद्ध इंद्रपद तूंच ह्याला दिलें होतेंस; आणि तें आपलें पद आतां तूं ह्याच्यापासून परत घेतलेंस ही गोष्ट ठीकच झाली. स्वतःला मोह पाडणाऱ्या संपत्तीपासून ह्याला भ्रष्ट केलें हा त्या बलीवर तूं मोठा अनुग्रहच केलास असें मी मानितों ॥ १६ ॥ जिच्या योगानें मनोनिग्रह केलेला विवेकी पुरुषहि मोह पावतो, ती संपत्ति प्राप्त झाली असतां कोणाला बरें आत्म्याचें तत्त्व यथास्थितपणें दिसणार आहे ? हे नारायणा, तुज सर्वलोकसाक्षी जगदीश्वराला नमस्कार असो ॥ १७ ॥

शुकाचार्य म्हणाले,–हे राजा, असें बोलून तो प्रल्हाद भगवंताचें उत्तर ऐकण्यासाठीं हात जोडून उभा राहिला असतां भगवान् ब्रह्मदेव त्या वामनाशीं भाषण करण्याकरितां पुढें झाला ॥ १८ ॥ इतक्यांत हे राजा, वारुणपाशांनीं बद्ध झालेल्या आपल्या पतीला अवलोकन करून भयानें विह्वल झालेली त्या बलीची पतिव्रता पत्नी विंध्यावली नम्रपणें हात जोडून व खालीं मान घालून वामनाला बोलूं लागली ॥ १९ ॥

विंध्यावली म्हणाली,–हे ईश्वरा, हें त्रैलोक्य तूं आपल्या क्रीडेकरितां उत्पन्न केलें आहेस; असें असतांहि अप्रबुद्ध इतर लोक त्यावर आपलें स्वामित्व दाखवितात; परंतु असें स्वामित्व दाखविणारे ते ह्या त्रिभुवनाची उत्पत्ति, स्थिति व लय करणाऱ्या तुला खरोखर काय अर्पण करूं शकणार आहेत ? ते निर्लज्ज असून त्यांचा कर्तृत्वाविषयींचा अभिमान तूं खालीं पाडितोस ॥ २० ॥

ब्रह्मदेव म्हणाला,–हे भूतोत्पादका, हे भूतनियंत्या, हे देवाधिदेवा व हे जगदात्म्या, हा बलिराजा दंडास पात्र नाहीं. याचें सर्वस्व हरण झालें आहे, तरी आतां ह्याला तूं सोडून दे ! ॥ २१ ॥ ह्यानें उदारबुद्धीनें तुला सर्व भूमिच काय, पण आपल्या कर्मांनीं

संपादन केलेले स्वर्गादि लोक, प्रत्यक्ष देहसुद्धां असें सर्वस्व अर्पण केलें आहे ॥ २२ ॥ आणि दुसरें असें कीं, निष्कपटबुद्धि असा कोणीहि पुरुष, ज्याच्या चरणांवर उदकाचें अर्घ्य समर्पण करून अथवा दूर्वांकुरांनीं चांगली पूजा करून उत्तम गतीला पावतो, अशा तुझ्या चरणांवर या बलीनें उदारमनानें त्रैलोक्य अर्पण केलें असतां त्याला कसें बरें दुःख प्राप्त व्हावें ? ॥ २३ ॥

श्रीभगवान् म्हणाला,—हे ब्रह्मदेवा, ज्याच्यावर मी अनुग्रह करण्याची इच्छा करितों, त्याचें द्रव्य, ऐश्वर्य इत्यादि मी त्याच्यापासून हिरावून घेतों. कारण, द्रव्यादिकांच्या मदानें युक्त झालेला पुरुष लोकांचा व माझा अवमान करूं लागतो ॥ २४ ॥ परतंत्र असलेला हा जीवात्मा आपल्या कर्मांनीं नाना प्रकारच्या कृमिकीटकादि योनींमध्यें संचार करीत असतां क्वचित् केव्हां तरी पुण्यवशेंकरून पुरुषजन्म पावतो ॥ २५ ॥ तेव्हां ह्या जन्मामध्यें जाति, कर्म, वय, रूप, विद्या, ऐश्वर्य व धन इत्यादिकांच्या योगानें याला जर गर्व न होईल तर ती माझी कृपाच होय ॥ २६ ॥ हे ब्रह्मदेवा, माझ्या ठिकाणीं अनन्यनिष्ठा ठेवणारा पुरुष मात्र अभिमान व उद्धटपणा यांना कारणीभूत व सर्व पुरुषार्थांना सर्व प्रकारें प्रतिकूल अशा जन्मादिकांच्या योगानें मोहित होत नाहीं ॥ २७ ॥ हे ब्रह्मदेवा, दैत्यदानवांचा अधिपति व कीर्तिवर्धक असा हा बलि, क्लेश भोगीत असूनहि मोह पावत नाहीं ह्यावरून माझ्या अजिंक्य मायेला ह्यानें जिंकिलें आहे यांत संशय नाहीं ॥ २८ ॥ अहो ! ह्याचें द्रव्य क्षीण झालें, हा आपल्या स्थानापासून भ्रष्ट झाला, शत्रूंनीं ह्याचा तिरस्कार करून ह्याला बद्ध केलें, ज्ञातींनीं ह्याचा त्याग केला, ह्याला यातना भोगावयास लाविलें, गुरूनें ह्याची निर्भर्त्सना करून ह्याला शाप दिला, तथापि ह्याचा संकल्प दृढ असल्यामुळें ह्यानें सत्याचा त्याग केला नाहीं व मीं कपटानें ह्याला धर्म सांगितला; तथापि, धर्माचा त्याग त्यानें केला नाहीं. यास्तव हा खरा सत्यवक्ता आहे ॥ २९ ॥ ३० ॥ म्हणून मी ह्याला देवांनाहि प्राप्त होण्यास अशक्य असें स्थान दिलें आहे. सावर्णि मन्वन्तरामध्यें हा माझ्या आश्रयानें इंद्र होईल ॥ ३१ ॥ तोंपर्यंत हा विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या सुतलामध्यें राहूं दे. त्या ठिकाणीं राहणाऱ्या लोकांना माझ्या दर्शनामुळें आधि, व्याधि, ग्लानि, आळस, पराभव व इतर उपद्रव मुळींच प्राप्त होत नाहींत ॥ ३२ ॥ ब्रह्मदेवाला एवढें सांगून भगवान् बलिराजाला म्हणाला,—हे बलिराजा, तूं आपल्या ज्ञातिबांधवांसह, देवादिकहि ज्याच्या प्राप्तीची इच्छा करितात अशा सुतलामध्यें प्रवेश कर. तुझें कल्याण असो ! ॥ ३३ ॥ तेथें वास करीत असतां इंद्रादिक लोकपालहि तुझा पराभव करूं शकणार नाहींत, मग दुसऱ्याची काय कथा ! तेथें जे तुझ्या आज्ञेबाहेर वागणारे दैत्य असतील त्यांचा माझें सुदर्शनचक्र

नाश करील ॥ ३४ ॥ हे वीरा, तेथें तुझा खास परिवार व भोगसाधनें ह्यांसह तुझें मी सर्व उपद्रवांपासून रक्षण करीन, आणि त्या ठिकाणीं मी सर्वदा जवळ राहीन व त्यायोगें माझें दर्शनहि तुला घडेल ॥ ३५ ॥ त्या ठिकाणीं माझा प्रभाव तुझ्या दृष्टीस पडेल आणि त्यामुळें दैत्यदानवांच्या संगतींत तुला प्राप्त झालेला तुझा आसुरी स्वभाव कुंठित होऊन तत्काळ नष्ट होईल ! ॥ ३६ ॥

## अध्याय बाविसावा समाप्त

---

# अध्याय २३ वा

शुकाचार्य म्हणाले,— हे परीक्षित्‌राजा, याप्रमाणें पुराणपुरुष वामनानें सांगितलें असतां, महाप्रभावशाली व सर्व साधूंना मान्य अशा बलिराजाचे नेत्र अश्रुबिंदूंनीं भरून गेले. तो हात जोडून उभा राहिला आणि प्रेमानें कंठ दाटल्यामुळें अडखळणाऱ्या शब्दांनीं त्यानें वामनाला उत्तर दिलें ॥ १ ॥

बलि म्हणाला,— अहाहा ! तुझ्या प्रणामाचा केवढा महिमा हा ! तो प्रणाम करण्याचा नुसता प्रयत्न केला तरी शरणागत भक्तांचें जें इष्ट कार्य तें करण्यास तो तत्पर होतो. कारण मीं केवळ नमस्काराचा प्रयत्न केला, तोंच लोकपाल अशा इंद्रादि देवांवरहि जी तुझी कृपा पूर्वीं कधीं झाली नाहीं, ती तूं मज असुरावर केलीस ॥ २ ॥

शुकाचार्य म्हणाले,— हे राजा, ह्याप्रमाणें भाषण करून वरुणापाशांतून मुक्त झालेल्या त्या बलिराजानें श्रीहरीला व रुद्रासह ब्रह्मदेवाला नमस्कार केला आणि प्रसन्न अंतःकरणानें असुरांसह सुतलामध्यें प्रवेश केला ॥ ३ ॥ असो. याप्रमाणें भगवंतानें बलिराजापासून घेतलेला स्वर्ग इंद्राला परत मिळवून दिला व त्यायोगें अदितीचा मनोरथ परिपूर्ण करून सर्व जगाचें पालन केलें ॥ ४ ॥ नंतर आपल्या वंशवर्धक नातवावर ईश्वराचा प्रसाद होऊन त्याची वरुणपाशांतून मुक्तता झाली असें पाहून भक्तीनें नम्र झालेला प्रल्हाद वामनाची स्तुति करूं लागला ॥ ५ ॥

प्रल्हाद म्हणाला,— हे भगवंता, जगाला पूज्य अशा ब्रह्मादिकांनींहि ज्याच्या चरणांचें वंदन करावें असा तूं आम्हां असुरांचा दुर्गपाल झाला आहेस. हा जो तुझा प्रसाद आम्हांवर झाला आहे तो ब्रह्मदेव, लक्ष्मी अथवा रुद्र ह्यांनासुद्धां कधीं प्राप्त झालेला नाहीं ॥ ६ ॥ प्राणिमात्राला आश्रय देणाऱ्या हे प्रभो, ज्या तुझ्या चरणकमलांतील मकरंदाचें सेवन केल्यामुळें ब्रह्मादिकांनाहि सृष्टिसामर्थ्यादिक ऐश्वर्य प्राप्त होतें, त्या तुज भगवंताच्या कृपादृष्टीला दुष्ट आचरण करणारे व उग्र कुळांत जन्मलेले असे आम्ही कसे बरें पात्र झालों ? ॥ ७ ॥ प्रभो, तुझें चरित्र खरोखरच आश्चर्यकारक आहे. अचिंत्य अशा योगमायेच्या लीलेनें तूं भुवनें उत्पन्न केलींस. तूं सर्वात्मा, सर्वज्ञ, समदृष्टि व सर्वांवर सारखा भाव ठेवणारा असूनहि भक्तांचें प्रिय करतोस आणि कल्पवृक्षाप्रमाणें त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण करितोस ॥ ८ ॥

भगवान् म्हणाला,— बाळा प्रल्हादा, तुझें कल्याण असो. आतां तूं सुतलांत जा व नातवासह तेथें आनंदानें राहून बांधवांना संतुष्ट कर ॥ ९ ॥ त्या ठिकाणीं मी हातामध्यें गदा घेऊन द्वारावर उभा राहीन व तुला माझें नित्य दर्शन घडेल आणि माझ्या दर्शनानें तुला मोठा आनंद होऊन त्याच्या योगानें तुझें कर्मबंधन तुटून जाईल ॥ १० ॥

शुक्राचार्य म्हणाले,– हे राजा, ही भगवंताची आज्ञा त्या निर्मलबुद्धि प्रल्हादानें बलीसह 'ठीक आहे' असें म्हणून शिरसा मान्य केली आणि हात जोडून त्या आदिपुरुषाला प्रदक्षिणापूर्वक नमस्कार केला आणि सर्व असुरांचा सेनापति असा तो भगवंताची अनुज्ञा घेऊन सुतलांत गेला ॥ ११ ॥ १२ ॥ हे राजा, बलि तेथून गेल्यावर ब्रह्मवेत्त्यांच्या त्या सभेंत ऋत्विजांमध्यें आपल्याजवळ बसलेल्या शुक्राचार्याला भगवान् वामन म्हणाला,– हे शुक्राचार्य, यज्ञ करणाऱ्या आपल्या शिष्याचें त्या कर्मामध्यें जें कांहीं न्यून राहिलें असेल तें तूं आतां पूर्ण कर. कर्मामध्यें जें वैगुण्य असतें तें ब्राह्मणांनीं पाहिलें हेंच असतांच पूर्ण होतें ॥ १३ ॥ १४ ॥

शुक्राचार्य म्हणाला,– हे भगवन्, ज्या बलीनें सर्वस्व अर्पण करून कर्मप्रवर्तक, यज्ञफलदाता व यज्ञमूर्ति अशा तुझें पूजन केलें, त्याच्या कर्मामध्यें वैगुण्य कोठून असणार ? ॥१५॥ हे प्रभो, मंत्रामध्यें किंवा तंत्रामध्यें वैगुण्य झाल्यामुळें, देशकालांच्या उल्लंघनामुळें, सत्पात्रीं दान न झाल्यानें किंवा वस्तूंच्या न्यूनतेमुळें,कर्मामध्यें जो कांहीं दोष उत्पन्न झाला असेल तो सर्व तुझ्या नामसंकीर्तनानेंच नष्ट होऊन कर्माची पूर्तता होते ॥ १६ ॥ तथापि, हे सर्वव्यापका, सन्मार्गाचा उपदेश करणाऱ्या तुझी आज्ञा मी पाळीन; कारण तुझ्या आज्ञेचें पालन करणें पुरुषाच्या परमपुरुषार्थाचें साधन होय ॥ १७ ॥

शुकाचार्य म्हणाले,–हे राजा, याप्रमाणें श्रीहरीच्या आज्ञेचा अंगीकार करून भगवान् शुक्राचार्यानें ब्रह्मर्षीसह बलीच्या यज्ञांतील न्यून असलेलें कर्म पूर्ण केलें ॥१८॥ ह्याप्रमाणें वामनरूप धारण करणाऱ्या श्रीहरीनें बलीपासून याचना करून पूर्वी शत्रूंनीं हरण केलेलें स्वर्गाचें राज्य आपला भाऊ जो इंद्र त्याला परत मिळवून दिलें ॥ १९ ॥ तेव्हां दक्षादि प्रजापति, भृगु, अंगिरा आदिकरून ब्राह्मण, तसेंच देव, ऋषि, पितर, भूपति, सनत्कुमार व शंकर ह्यांसह प्रजापतींचाहि अधिपति अशा ब्रह्मदेवानें, कश्यप व अदिति यांना संतुष्ट करण्यासाठीं व भूतमात्रांच्या कल्याणासाठीं, लोक व लोकपाल ह्यांचें आधिपत्य वामनाला दिलें ॥ २० ॥ ॥ २१ ॥ वेद, सर्व देव, धर्म, यश, श्री, मंगलें, व्रतें, स्वर्ग व मोक्ष ह्यांचें पालन करण्याविषयीं समर्थ अशा वामनाला सर्वांच्या अभ्युदयाकरितां उपेंद्र असा अधिकार देऊन सर्वांचा रक्षणकर्ता नेमिलें. हे राजा, त्या वेळीं सर्व प्राण्यांना अत्यंत आनंद झाला ॥ २२ ॥ ॥ २३ ॥ नंतर ब्रह्मदेवाचें अनुमोदन घेऊन लोकपालांसह इंद्रानें वामनाला आपल्या विमानामध्यें अग्रभागीं बसून स्वर्गी नेलें ॥ २४ ॥ याप्रमाणें उपेंद्राच्या बाहुबलानें इन्द्राचें रक्षण झाल्यामुळें त्याला त्रिभुवनाचें राज्य प्राप्त झालें व तो परम संपत्तीनें युक्त व निर्भय होऊन आनंदित झाला ॥ २५ ॥ हे राजा, नंतर ब्रह्मदेव, शंकर, सनत्कुमार, भृगुप्रभृति मुनि, पितर, सर्व भूतें, सिद्ध व विमानांतूनसंचार करणारे इतरंहि जे देव, ते फारच आश्चर्यकारक अशा त्या विष्णूचा अत्यंत मोठा पराक्रम गात गात आपआपल्या स्थानीं निघून गेले आणि अदितीचीहि प्रशंसा करूं लागले ॥२६ ॥ २७ ॥ असो. हे कुरुकुल नंदना परीक्षित्‌राजा, हें वामनाचें सर्व चरित्र मीं तुला

सांगितलें. तें ऐकिलें असतां श्रोत्यांना पापापासून मुक्त करितें ॥ २८ ॥ हे राजा, नाना प्रकारांनीं पराक्रम करणाऱ्या विष्णूच्या संपूर्ण महिम्याचें जो वर्णन करील, तो मनुष्य पृथ्वीच्या परमाणूंचीहि गणना करील असें समजावें. पूर्वीं होऊन गेलेला अथवा विद्यमान असा कोणताहि मनुष्य भगवंताच्या महिम्याचा अंत लावूं शकेल काय ? असें * मंत्रद्रष्ट्या वसिष्ठऋषीनेंहि भगवंताविषयीं म्हटलें आहे ॥ २९ ॥ असो. अद्भुत कर्मे करणाऱ्या देवाधिदेव श्रीहरीचें वामनावतारासंबंधीचें चरित्र जो पुरुष श्रवण करितो, त्याला सर्वोत्कृष्ट गति प्राप्त होते ॥ ३० ॥ यज्ञादिक, श्राद्धादिक किंवा गुरुपूजादिक कर्म चाललें असतां जेथें जेथें ह्या वामनाच्या चरित्राचें कीर्तन होतें, तेथें तेथें तें कर्म यथासांग झालें असें म्हणतात ॥ ३१ ॥

---

* " न ते विष्णो जायमानो न जातो देव महिम्नः परमंतमाप "

असें वसिष्ठानें आपल्या सूक्तामध्यें म्हटलें आहे ( ऋग्वेद मं. ७ सू. ९९ ऋ. २) अर्थ—हे देवा विष्णो, विद्यमान अथवा होऊन गेलेला कोणताहि पुरुष तुझ्या परपाराला पोंचला नाहीं.

**अध्याय तेविसावा समाप्त**

---

# अध्याय २४ वा

परीक्षित् म्हणाला, —हे शुकाचार्य, मायेच्या योगानें मत्स्यरूप घेऊन तसें वर्तन केल्याचें वृत्त जिच्यामध्यें आहे, अशी ती अद्‌भुत कर्में करणाऱ्या श्रीहरीची पहिल्या अवताराची कथा श्रवण करण्याची मला इच्छा आहे ॥ १ ॥ स्वतः सर्वसमर्थ असूनहि श्रीहरीनें एखाद्या कर्मग्रस्त जीवाप्रमाणें तमोगुणात्मक, लोकांनीं निंदिलेलें व दुःसह असें मत्स्यरूप कां धारण केलें, तें सर्व आम्हांला यथास्थितपणें सांगा. कारण, हे भगवन्, श्रेष्ठकीर्ति परमेश्वराचें चरित्र सर्व लोकांना सुखावह आहे ॥ २ ॥ ॥ ३ ॥

सूत म्हणाला, —हे शौनका, परीक्षित्‌राजानें याप्रमाणें प्रश्न केला असतां भगवान् विष्णूनें मत्स्यरूप घेऊन जें चरित्र केलें तें सांगण्यास शुकाचार्यांनीं आरंभ केला ॥ ४ ॥ ते म्हणाले,— हे राजा, भगवान् स्वतंत्र असूनहि, गाई, ब्राह्मण, देव व अर्थ ह्यांचें रक्षण करण्याच्या इच्छेनें मत्स्यादि अवतार धारण करितो ॥ ५ ॥ ज्याप्रमाणें वायु, लहानमोठ्या प्राणिमात्रांच्या शरिरांत संचार करीत असूनहि स्वतः लहानमोठा होत नाहीं, त्याप्रमाणें बुद्धीच्या गुणांच्या योगानें उत्कृष्टनिकृष्ट अशा सर्वभूतांमध्यें नियंतृरूपानें संचार करीत असणारा ईश्वरहि निर्गुण असल्यामुळें, स्वतः उत्कृष्ट किंवा निकृष्ट होत नाहीं ॥ ६ ॥ हे राजा, गेल्या कल्पाच्या अंतीं ब्रह्मदेव निद्रिस्थ झाल्यामुळें जो प्रलय झाला, त्या वेळीं भूरादिक लोक समुद्रामध्यें बुडून गेले ॥ ७ ॥ तेव्हां कालगतीनें निद्रा प्राप्त झाल्यामुळें शयन करण्याची इच्छा करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या मुखांतून बाहेर पडलेले वेद जवळच असलेल्या हयग्रीव दैत्यानें हरण केले ॥ ८ ॥ तेव्हां त्या दैत्याधिपति हयग्रीवाचें तें कृत्य जाणून, सर्वसमर्थ भगवान् श्रीहरीनें मत्स्यरूप धारण केलें ॥ ९ ॥ त्या कल्पामध्यें नारायणाचा एकनिष्ठ भक्त असा सत्यव्रत नांवाचा कोणी महात्मा राजर्षि केवळ उदक प्राशन करून तप करीत होता ॥ १० ॥ चालू बाराहमहाकल्पामध्यें सूर्याचा पुत्र श्राद्धदेव म्हणून जो प्रसिद्ध आहे व ज्याला श्रीहरीनें मनूचा अधिकार दिला आहे, तो हा त्या वेळचा सत्यव्रतराजाच होय ॥ ११ ॥ एके दिवशीं तो सत्यव्रतराजा कृतमालानदीच्या तीरीं जलानें तर्पण करीत असतां त्याच्या ओंजळींतील पाण्यांत एक लहानसा मासा पडला ॥ १२ ॥ तेव्हां हे भरतकुलोत्पन्ना राजा, द्रविडदेशाधिपति सत्यव्रतराजा ओंजळीमध्यें आलेल्या त्या माशाला उदकासह नदीच्या पाण्यांत सोडूं लागला ॥ १३ ॥ पण तो मासा राजाला म्हणाला, —हे दीनवत्सला राजा, ज्ञातीचा घात करणाऱ्या जलचर प्राण्यांच्या भीतीनें मी घाबरून दीन झालों आहें. तरी ह्या नदीच्या पाण्यांत तूं मला कृपा करून सोडूं नको ॥ १४ ॥ तेव्हां आपल्यावर अनुग्रह करण्याकरितां परमेश्वरच प्रीतीनें मत्स्यरूप धारण करून येथें आला आहे हें न जाणून, त्या सत्यव्रतानें त्या माशाचें आपण

रक्षण करावें असें मनांत आणिलें आणि त्याचें अतिदीनवाणें बोलणें ऐकून त्या दयाळु राजानें त्याला आपल्या कमंडलूंतील पाण्यांत घालून आपल्या आश्रमीं नेलें ॥ १५ ॥ ॥ १६ ॥ तेथें तो मासा एका रात्रींतच इतका वाढला कीं, त्या कमंडलूमध्यें त्याला वाव मिळत नाहींसा झाला. तेव्हां तो मासा सत्यव्रतराजाला म्हणाला ॥ १७ ॥ हे राजा, ह्या कमंडलूंत कष्टानें राहणें मला बरें वाटत नाहीं. यास्तव, ज्या ठिकाणीं मला सुखानें राहतां येईल अशा चांगल्या मोठ्या स्थानाची तूं व्यवस्था कर ! ॥ १८ ॥ हें ऐकून राजानें त्याला कमंडलूंतून बाहेर काढून रांजणांतील उदकांत सोडिलें. तेथेंहि तो मासा एका मुहूर्तामध्यें तीन हात लांब वाढला आणि राजाला म्हणाला, हे राजा, हा रांजणहि मला सुखानें राहण्यास पुरत नाहीं. मी तुला शरण आलों आहें. तूं मला राहण्यास याहूनहि मोठें स्थान दे ॥ १९ ॥ ॥ २० ॥ हे परीक्षित्‌राजा, नंतर त्या राजानें त्याला त्या रांजणांतून काढून सरोवरामध्यें सोडिलें; पण तेथेंहि तो सारखा वाढत गेला आणि त्यानें तें सारें सरोवर आपल्या देहानें व्यापून टाकिलें ॥ २१ ॥ तो पुनः सत्यव्रताला म्हणाला, —हे राजा, पाण्यामध्येंच नित्य राहणाऱ्या मला हें सरोवरांतील उदकहि अपुरें असल्यानें सुखावह होत नाहीं; ह्यास्तव माझ्या रक्षणाचा कांहीं उपाय कर आणि केव्हांहि न आटणाऱ्या अशा मोठ्या व खोल डोहामध्यें मला नेऊन ठेव ! ॥२२॥ माशानें असें सांगितलें असतां, सत्यव्रतराजानें त्याला क्रमाक्रमानें मोठ्या व न आटणाऱ्या जलाशयांत नेलें; पण प्रत्येक वेळीं तो वाढूं लागला व तो तो जलाशय त्यास पुरेनासा झाला. तेव्हां त्याला शेवटीं राजानें समुद्रांत सोडिलें ॥ २३ ॥ राजा त्याला समुद्रामध्यें सोडीत असतां तो मत्स्य त्याला म्हणाला, हे वीरा, तूं मला येथें सोडूं नकोस-कारण, ह्या ठिकाणीं अति प्रबल असे मकरादि जलचर मला खाऊन टाकितील ॥ २४ ॥ ह्याप्रमाणें सुंदर भाषण करून त्या मत्स्यानें सत्यव्रताला अत्यंत मोहित करून टाकिलें असतां तो त्याला म्हणाला, —' मत्स्यरूपानें आम्हांस मोह पाडणारा असा तूं आहेस तरी कोण ? ॥ २५॥ तूं एका दिवसांत शंभर योजनें विस्तीर्ण असें सरोवर व्यापून टाकिलेंस, अशा प्रकारचा प्रभाववान् जलचर प्राणी आम्हीं कधीं पाहिला नाहीं व ऐकिलाहि नाहीं ॥ २६ ॥ खरोखर क्षयरहित व दुःखहर्ता असा जो भगवान् नारायण तोच तूं साक्षात् असून आमच्यासारख्या भूतांवर अनुग्रह करण्याकरितां हें जलचरप्राण्याचें रूप धारण केलें आहेस ॥ २७ ॥ जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करणाऱ्या हे पुरुषश्रेष्ठा, तुला नमस्कार असो. हे विश्वव्यापका, आम्हां शरणागत भक्तांचा मुख्य आत्मा व आश्रयहि तूंच आहेस ॥ २८ ॥ तुझे सर्वहि लीलावतार प्राण्यांच्या अभ्युदयासाठींच आहेत हें खरें; तथापि ज्याकरितां तूं हें मत्स्यरूप धारण केलें आहेस तें विशेष कारण जाणण्याची मला इच्छा आहे ॥ २९ ॥ हे कमलनयना,ज्या अर्थी आम्हां भक्तजनांना तूं आपलें हें अद्‌भुत रूप दाखविलेंस, त्या अर्थी आम्हांला असें वाटतें कीं, दुसऱ्या देहादिकाचा अभिमान बाळगणाऱ्या पुरुषांना शरण जाणें जसें व्यर्थ होतें तसें सर्वांचा मित्र, प्रिय व आत्मा अशा तुझ्या चरणांना शरण जाणें व्यर्थ होणार नाहीं ॥ ३० ॥

शुकाचार्य म्हणाले, —हे राजा, ज्याला एकनिष्ठ भक्त प्रिय आहेत असा तो कल्पक्षयाच्या वेळीं प्रलयसमुद्रामध्यें क्रीडा करण्याकरितां मत्स्यरूप धारण करणारा जगदीश्वर भगवान् याप्रमाणें भाषण करणाऱ्या त्या सत्यव्रतराजाला त्याचें प्रिय करण्याच्या इच्छेनें उत्तर देऊं लागला ॥ ३१ ॥

श्रीभगवान् म्हणाला, हे शत्रुदमना राजा, आजपासून सातव्या दिवशीं हें भूर्भुवादिक त्रैलोक्य प्रलयसमुद्रामध्यें बुडून जाणार आहे ॥३२॥ प्रलयोदकामध्यें त्रैलोक्य लीन होऊं लागलें म्हणजे त्याच वेळीं मीं सोडलेली एक विस्तीर्ण नौका निश्चयेंकरून तुझ्याजवळ येईल. त्या वेळीं तूं मात्र सर्व औषधि व लहान मोठीं सर्व बीजें घेऊन सप्तर्षींसह सर्व प्राणिमात्रांचा मोठा परिवार घेऊन त्या महानौकेंत चढ. त्या प्रलयसागरांत सूर्यादिकांचा प्रकाश नसला तरी त्यांत ऋषींच्याच प्रकाशानें तुला निर्भयपणें संचार करतां येईल ॥३३ ॥३४॥ ३५॥ नंतर मोठ्या वाऱ्यामुळें ती नाव डोलूं लागली असतां मीं तेथें येईन. मग ती नाव तूं वासुकिसर्पाची दोरी करून माझ्या शिंगाला बांध म्हणजे हे प्रभो, जोंपर्यंत ब्रह्मदेवाची रात्र आहे तोंपर्यंत ऋषींसह त्या नौकेंत बसलेल्या तुला मी त्या प्रलयसागरामध्यें ओढीत संचार करीन ॥३६॥ ३७॥ नंतर परब्रह्म म्हणून वर्णिलेलें माझें स्वरूप व माहात्म्य तूं केलेल्या उत्तम प्रश्नानुसार मीं तुला स्पष्ट रीतीनें कथन करीन आणि माझ्या कृपेनें तें तुझ्या हृदयांत चांगलें ठसेल ॥३८॥ याप्रमाणें राजाला सांगून तो मत्स्यमूर्ति श्रीहरी तेथेंच गुप्त झाला आणि राजाहि भगवंतानें सांगितलेल्या काळाची प्रतीक्षा करीत पूर्वेकडे अग्रें केलेले दर्भ अंथरून त्यांवर ईशान्य दिशेकडे मुख करून मत्स्यरूपी श्रीहरीच्या चरणांचें चिंतन करीत बसला ॥३९॥ ४०॥ इतक्यांत वृष्टि करणाऱ्या महामेघांनीं वृद्धिंगत होऊन मर्यादेचें उल्लंघन करणारा समुद्र सर्व बाजूंनीं पृथ्वीला बुडवीतच आहे कीं काय असा दिसूं लागला ॥ ४१ ॥ तेव्हां मत्स्यरूपी भगवंताच्या आज्ञेचें चिंतन करीत बसलेल्या त्या सत्यव्रतराजाला आपल्याजवळ आलेली नाव दिसली आणि औषधि व बीजें घेऊन तो सप्तर्षींसह तींत जाऊन बसला ॥ ४२ ॥ तेव्हां संतुष्ट झालेले सप्तऋषि सत्यव्रताला म्हणाले,— हे राजा, तूं केशवाचें ध्यान कर, म्हणजे तोच आमचें ह्या संकटापासून रक्षण करून आम्हांस सुख देईल ॥ ४३ ॥ याप्रमाणें त्यांनीं सांगितलें असतां राजानें ध्यान केलें; तेव्हां सोनेरी रंगाचा व लक्ष योजनें विस्तीर्ण असा एक शिंगाचा मासा त्या महासागरामध्यें प्रकट झाला ॥ ४४ ॥ त्याला पाहून पूर्वीं श्रीहरीनें सांगितल्याप्रमाणें वासुकिसर्पाचा दोर करून त्याच्या शिंगाला ती नाव सत्यव्रतराजानें बांधली आणि मनामध्यें संतुष्ट होऊन तो मधुसूदन-भगवंताची स्तुति करूं लागला ॥ ४५ ॥ हे भगवन्, अनादि अविद्येनें ज्यांचें आत्मज्ञान आच्छादित झालें आहे असे अविद्यामूलक संसारांतील परिश्रमांनीं व्याकुळ झालेले पुरुष ह्या संसारामध्यें सहज प्राप्त झालेल्या तुझ्या कृपेमुळेंच तुझा आश्रय करून तुझी प्राप्ति करून घेतात. तूं साक्षात् मुक्तिदाता आहेस. तरी तूं आमचा परमगुरु हो ॥ ४६ ॥ हे भगवन्, आपल्या कर्मरूप बंधनांनीं बद्ध झालेले हे अज्ञानी लोक,सुखाच्या इच्छेनें दुःख देणारें कर्म करीत असतां ज्याच्या सेवेनें त्या दुष्टमतिरूप इच्छेचा नाश होतो तो आमच्या

हृदयरूप ग्रंथीचा भेद करो. तोच आमचा परमगुरु आहे ॥ ४७ ॥ हे परमात्म्या, जसें सोनें किंवा रूपें अग्नीत तापविल्यानेंच आपला सर्व मळ टाकून देऊन शुद्ध स्वरूप प्रकट करितें त्याप्रमाणें मुमुक्षु पुरुष ज्याच्या सेवेनेंच आपला अज्ञानरूप मळ टाकून स्वरूपाची प्राप्ति करून घेतात. तो व्ययरहित ईश्वरच आमचा गुरु होवो. गुरूंचाहि परमगुरु तोच आहे ॥ ४८ ॥ हे भगवन्, देव, गुरु व इतर लोक हे सर्व एकत्र मिळाले असतांहि ज्याच्या प्रसादाच्या दहा हजाराव्या अंशाच्या अंशाइतकाहि प्रसाद एखाद्या पुरुषावर करण्यास स्वतः समर्थ होत नाहींत, त्या तुज ईश्वराला मी शरण आलों आहें ॥ ४९ ॥ हे ईश्वरा, एखाद्या नेत्रहीन पुरुषाला आंधळ्यांचा पुढारी केला असतां जी स्थिति होते, तीच स्थिति अज्ञानी जनांनीं अडाणी गुरु केला असतां होते. यास्तव सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें स्वतःसिद्ध ज्ञानवान् असून सर्व इंद्रियांचा प्रकाशक अशा तुलाच आम्ही आत्मतत्त्व जाणणाऱ्या इच्छेनें गुरु म्हणून वरिलें आहे ॥ ५० ॥ आपणाला गुरु असें मानणारा अज्ञ पुरुष दुसऱ्या अज्ञानी लोकांना अर्थकामविषयक उपदेश करितो व त्यामुळें ते लोक दुस्तर अशा संसारांतच पडतात; परंतु तूं अक्षय्य व अमोघ ज्ञानाचा उपदेश करितोस व त्यामुळें लोकांना अनायासानें स्वस्वरूपाची प्राप्ति होते ॥ ५१ ॥ हे परमात्म्या, तूं सर्व लोकांचा हितकर्ता, प्रिय, ईश्वर, आत्मा, गुरु, अभीष्ट फल देणारा व ज्ञानरूपी असा जरी आहेस, तथापि, विवेकशून्य व विषयासक्त असे हे लोक हृदयांत असलेल्याहि तुला जाणत नाहींत ॥ ५२ ॥ हे भगवन्, देवांनाहि पूज्य अशा त्या तुज श्रेष्ठ ईश्वराला मी तत्त्वोपदेशाकरितां शरण आलों आहें. ह्यास्तव तूं परमार्थ स्पष्ट करणाऱ्या वाक्यांनीं माझ्या हृदयामध्यें असणाऱ्या अहंकारग्रंथीला तोडून टाकून आपलें रूप प्रगट कर ॥ ५३ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, ह्याप्रमाणें सत्यव्रतराजानें प्रार्थना केली असतां त्याला महासागरामध्यें मत्स्यरूपानें क्रीडा करणाऱ्या त्या भगवान् आदिपुरुषानें तत्त्वाचा उपदेश केला ॥ ५४ ॥ सांख्य, योग व कर्म यांचें जिच्यामध्यें प्रतिपादन केलेलें आहे, अशी आत्मरहस्यरूप संपूर्ण दिव्य मत्स्यपुराणसंहिता भगवंतानें सत्यव्रतराजर्षीला सांगितली ॥ ५५ ॥ तेव्हां ऋषींसह नावेमध्यें बसलेल्या त्या सत्यव्रतराजर्षीनें भगवंतानें सांगितलेलें तें सनातन ब्रह्मरूप आत्मतत्त्व संशयरहित होऊन ग्रहण केलें ॥ ५६ ॥ नंतर त्या मत्स्यमूर्ति श्रीहरीनें हयग्रीव असुराचा वध करून त्याच्यापासून आणिलेले वेद परत दिले ॥ ५७ ॥ मग शास्त्रोक्त ज्ञान व प्रत्यक्षज्ञान ह्यांनीं युक्त झालेला तो सत्यव्रतराजा, विष्णूच्या प्रसादानें ह्या कल्पामध्यें श्राद्धदेवनामक वैवस्वतमनु झाला ॥ ५८ ॥ मायेनें मत्स्यरूप धारण करणारा भगवान् व राजर्षि सत्यव्रत ह्यांमधील संवादाचें हें मोठें आख्यान श्रवण करणारा पुरुष पातकापासून मुक्त होईल ॥ ५९ ॥ तसाच हा जो भगवंताचा अवतार झाला, त्याचें प्रतिदिवशीं जो पुरुष कीर्तन करील त्याचे सर्व मनोरथ सिद्धीस

जातील व अंतीं त्याला उत्तम गति प्राप्त होईल ॥ ६० ॥ असो. ज्यानें, प्रलयोदकामध्यें निद्रित असलेल्या ब्रह्मदेवाच्या मुखांतून हयग्रीवानें दूर नेलेले वेद त्या दैत्याचा वध करून पुनरपि आणून ब्रह्मदेवाला दिले व ज्यानें सत्यव्रत आणि ऋषि यांना ब्रह्मप्रतिपादक असें मत्स्यपुराण कथन केलें, त्या मायेनें मत्स्यरूप धारण करणाऱ्या व सर्व सृष्टीचें कारण अशा भगवंताला मी नमस्कार करितों ॥ ६१ ॥

**अध्याय चौविसावा समाप्त**

---